संगीत

# कुंजविहारी.

हें नाटक

**रा. भार्गवराम विठ्ठल वरेरकर**

संगीत संजीवनी, सरस्वती, वरवर्णिनी, प्रेमाचा खेळ, कुंजविहारी, हाच मुलाचा बाप संन्यासाचा संसार, सत्तेचे गुलाम, लयाचा लय, तुरुंगाच्या दारांत, लढाईनंतर, नवा खेळ, रंकाचें वैभव

**इत्यादि नाटकांचे कर्ते**

यांनी लिहिलें.

तें

**रा. जनार्दन बाजिराव निमकर यांनीं**

**माधवाश्रम—मुंबई या ठिकाणीं**

प्रसिद्ध केलें.

आवृत्ति दुसरी.



१९२५.

किंमत १। रुपया.

# प्रस्तावना.

पहिली आवृत्ति संपल्यापासून आह्मास बरेच लोकांकडून दुसरी आवृत्ति छापण्याबद्दल सूचना आल्या परतु आमच्या कांहीं खासगी अडचणीमुळें तें काम इतक्या दिवसांत करतां आलें नाहीं. या कामीं आनंद-विलास संगीत नाटक मंडळीनें आपले मंडळीचे फोटो देऊन मदत केल्या-बद्दल आभारी आहोंत.

तारीख ६-१-१९२५. प्रकाशक.

ॐ नमो भगवते वासुदेवाय ।

# कुंजविहारी.

नांदी—( दावर दादार कादिर सतार ).

भुवनपाल सकलकाल दयाळ हा नंदबाल विशाल तमाल विपिनिं मधुर मुरली मिरवि ॥ धृ० ॥ निखिल-जनक निगमविदित यदुपति मधुरभक्ति देवो । पदकमलिं हृदय राहो सगुणरूप या निजपदरत जनिं दावो ॥ १ ॥

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

( नारद व स्नातक प्रवेश करितात. )

नारद—( रघुवर आज रहो. )

नटवर नाट्य करी भवरंगीं ॥ धृ० ॥
मंजुल चंचल नूपुरसिंजित मानस पंकजि भृंगी ॥ १ ॥
पदनखताडित कण धूलीचे भंगिति संग कुसंगीं ॥ २ ॥
पदतलीं पन्नग दुर्जन हाणी तांडव करुनि सुरंगीं ॥ ३ ॥

हे चिन्मयानंदस्वरूपा भगवंता, तुझ्या लीलेचा अंत तुझ्या नित्य सहवासानें धन्य झालेल्या आह्मां मुनिजनांनाहि कळणें दुरापास्त आहे. तुझ्या अतर्क्य घटनेचा विचार करणें ह्मणजे अगाध समुद्रांत टाकलेलें लवणखंड शोधण्यासारखेंच होय. हे निगमागमस्वरूपा, तुझें खरें स्वरूप जाणण्यास निष्काम सगुणभक्ति हें एकच साधन आणि दुष्काळपीडितांना जसें

अन्नदान करावें तसें ह्या द्वापारयुगांत तू सर्व अज्ञजनांना भक्तीचें दान करीत आहेस. अहाहा !--

( तनवारिदा. )

**कमलेक्षणा चतुरास्यताता ॥ धृ० ॥**
**अघपंकमग्नां । जढमूढदीना । निजभक्तिदाना । करिसी भवार्ता ॥ १ ॥ हठमार्ग योगी । कुणि राजयोगी । कुणि ज्ञानयोगी । न जाणे त्वदंता ॥ २ ॥ प्रणयान्विता ती । मधुरा स्वभक्ती । भवदाव पंथीं । करिसी सुवार्ता ॥ ३ ॥**

केवढा विपरीत काळ आला हा ! कर्मठांचें बंड माजलें; हठयोगी बहकले; शुद्धतत्वाचा सर्वत्र ऱ्हास झाला; कंस, चाणूर, शिशुपाल, वक्रदंत आदीकरून मानवरूपी राक्षसांनीं तुझ्या भक्तांचा छळ मांडला व त्यामुळें त्यांना जीवन देखील कष्टमय झालें. ज्या ज्या व्यक्तीच्या ठायीं ईश्वरी गुणांचा संभव दिसेल, त्या त्या व्यक्तीचा छळ करण्याचा या दुष्टांनीं उपक्रम केला. पण त्यांना तरी दुष्ट कां म्हणावें ? भगवंता, तुझ्या अवतारास कारणीभूत होणाऱ्या या दुर्जनांचे जगतावर केवढे उपकार आहेत ! यांनींच तुला खेंचून आणून या भूतलावर अवतार घ्यावयास लाविलें, आणि तुझें सगुणस्वरूप माझ्यासारख्या तुझ्या भक्तांच्या दृष्टीस पाडलें. खरोखर, सगुणावतारावांचून जगदुद्धार शक्य नाहीं. कारण, चमत्कारपूर्ण चरित्रावांचून समूहाचें समाधान होत नाहीं; अलौकिकतेशिवाय साधारण जनसमाजाची श्रद्धा बसत नाहीं; श्रद्धेशिवाय ज्ञानप्राप्ति होत नाहीं; ज्ञानावांचून भक्ति नाहीं, आणि भक्तिमार्गाची संस्थापना झाल्याशिवाय जगदुद्धार होणार नाहीं. जीव मायापाशांत गुंतलेला, ज्ञानी म्हणविणारे वेदवाक्यांवर अवलंबून राहिलेले, वेद 'नेति नेति' म्हणत आहेत, आणि तूं तर अनंत आहेस; तेव्हां अनंताचें अनंतत्व अनंतानें आपल्या अनंत लीलांनींच सिद्ध केलें पाहिजे. स्नातका, भगवंताच्या सगुणलीला पाहण्याकरितां आज आपण निघालों, त्या वेळीं तात ब्रह्मदेव काय ह्मणाले तुला आठवतें ना ?

**स्नातक**–तें मी कसें विसरेन ? भगवन् ! त्यांची ती गंभीरवाणी मी आतांच ऐकत आहें कीं काय असें मला वाटतें.

**नारद**–वत्सा, त्या वेळीं तात ह्मणाले, 'बाळा नारदा, गोकुलांत भगवंत अवतीर्ण झाले आहेत. दुर्जनांचा नाश करून सद्भक्तांचें परिपालन करण्याचें त्यांनीं मला अभिवचन दिलें आहे. परंतु गोपगोपीरूपानें अवतीर्ण झालेल्या सुरमुनिमंडळांच्या प्रणयांत ते आपल्याच मायेनें मोहित होण्याचा संभव असल्याकारणानें, तूं जाऊन त्यांना उदिष्ट कार्याची मुद्दाम आठवण दे. तसेंच भगवंताचा नित्य सहवास इच्छिणाऱ्या त्या गोपगोपींनांहि जगदुद्धाराकरितां भगवंताना गोकुळ सोडून लवकरच जावें लागणार आहे असें सांग. ह्मणजे भगवंताच्या आकस्मिक वियोगानें होणारें दुःख सहन करण्यास त्या थोड्या तरी समर्थ होतील.' अहाहा ! त्यावेळीं मी केवढा धन्य असें मला वाटलें ! एवढी मोठी कामगिरी मजकडे देऊन भगवंतानीं मला खरोखरच कृतार्थ केलें !

**स्नातक**–खरेंच भगवन् ! मलाही त्यावेळीं असेंच वाटलें.

(पडद्यांत–हरणी-हरणी एऽऽऽ-एऽऽहरणी.)

**नारद**–अरे, पण हे कोण ?

**स्नातक**–भगवन् ! मला वाटतें हे कुणीतरी गोपकुमार गुरें राखीत इकडेसच येत आहेत.

**नारद**–भगवद्दर्शनाचीं हीं पूर्वसुचिन्हेंच आहेत ह्मणावयाचीं. वत्सा, थांब ते कोठें जात आहेत तें पाहून त्या अनुरोधानेंच आपण आपला पुढील बेत ठरवूं.

(पेंद्या व सुबल प्रवेश करितात.)

**पेंद्या**–अग ए हरणी !

(सुन मेरे यारो.)

**अरे बघ गाई बुजाल्या वनीं पळाल्या नदींत जातिल धांव ।**
**उभारि शेंपुट उडोनि टणटण कुणि टवकारी कान ॥ धृ० ॥**
**वत्स धांवे, तें न पाहे, बळोंचि फिरवी मान । खाइ**

कालिया गाइ कालिं या संशय यांत न जाण । पळोनी धांव तयां जा आण ॥ १ ॥

भंडावून सोडलें या गुरांनीं ! अग ए हरणी ! आतां करूं तरी काय ? हा खडकाळ रस्ता आणि हीं असलीं खट्याळ गुरें ! गड्या सुबला, मघां कसा कोलमडलों आठवतें ना तुला ? चांगला तोंडघशींच पडलों असतों.

सुबल—छान झालें असतें ! कुणी पडला तर वांकडा होतो, तूं वांकडा आहेस तो पडल्यामुळें सरळ झाला असतास.

पेंद्या—तूं थेट त्या कृष्णासारखाच निर्दय आहेस. त्याला आहे का माझी कांहीं काळजी ? परवां नंदमहाराजांनीं यमुनेच्या डोहांत कालिया नांवाचा एक भयंकर सर्प येऊन राहिला असल्याचें सांगितलें. त्याच्या नुसत्या फूत्कारानेंच जीवजंतू मरतात असें ह्मणतात. तेव्हां गुरें डोहाकडे गेलीं तर काय प्रसंग ओढवेल तें आहे का याच्या ध्यानांत ? काळा दगड कुठला ! त्याला कसली आली आहे या पेंद्याची काळजी ?

सुबल—कसली बुवा एवढी पेंद्याची काळजी ?

पेंद्या—कसली काळजी ? नाहीं तुला ठाऊक ? अरे, हा पेंद्या कांहीं असा तसा नव्हे. वांकडा दिसतो खरा पण चोरीच्या कामांत सुतासारखा सरळ. कृष्णाला याचा केवढा उपयोग ! समज; कुठेंतरी खड्डयांत पडून यानें राम ह्मटलें, तर केवढे प्रसंग ओढवतील ते तुला आहे का ठाऊक ?

सुबल—काय व्हायचें आहे बुवा ? ऐकूं द्या तरी; तुटूंद्यात कीं आपल्या अकलेचे तारे !

पेंद्या—अरे बाबा, केवढाले भयंकर प्रसंग ओढवतील ! आधीं बाबांना या वृद्धापकाळीं पुत्रवियोग होईल; दुसरें, ललितेचें भावाचें पाठबळ नाहींसें होईल; कृष्णाच्या मोठेपणावर वाढून फुकटाफाकट दहींदुधावर यथेच्छ ताव मारून पोसलेल्या दुझ्यासारख्या पोळाचें वेळीं अवेळीं थट्टा करायला सांपडणारें तोंडीलावणें नाहींसें होईल. आणि कृष्णाचें केवढें नुकसान होईल आहे का ठाऊक !

सुबल—कृष्णाचीं कारस्थानें वठवायला एकट्या पेंद्याचा अभावच फारसा

आडवा येईल असें निदान मला तरी वाटत नाहीं. तूं नाहीं तर दुसरा! कृष्णाला पाठिंबा द्यायला या गोकुळांत असे केंसागणिक गोप तयार आहेत.

**पेंद्या**—असतील-असतील; पण बाबारे, पेंद्या तो पेंद्याच. त्याची योग्यता एकट्या कृष्णालाच माहीत. कृष्णा, कसारे असा निष्ठुर झालास? कायतरी हें घनदाट अरण्य! यांत रस्ता तरी कसा सांपडावा?

**सुबल**—थांब तूं येथेंच उभा रहा. मी आसपास शोधून कृष्ण कुठें आढळतो कीं काय तें पाहतो. (जातो.)

**पेंद्या**—झालें. एक सोंगडी होता तोहि गेला. रागावला वाटतें बेटा! रागवावयाचाच! तो कांहीं कृष्ण नव्हे! त्याला आपलें किती बोला, भांडण करा, शिव्या द्या पण सदा खुषींत. कधीं कधींही रागवायचाच नाहीं. कृष्णा-कृष्णा-अरे ओ दे रे गड्या-छे! प्राण चालला—(ठेंच लागून पडतो) अयायीग, मेलों—मेलों—अरे दगडा, पाषाणा, निर्दया, काळ्या—अरेरेरे!

**नारद**—(पुढें होऊन) अरेरे! बिचारें पोर हैराण होऊन पडलें वाटतें! पण श्रीकृष्णाला गालिप्रदान केलें त्याचेंच हें प्रायश्चित्त! बाळा, ऊठ-ऊठ—

**पेंद्या**—आलास एकदांचा काळतोंड्या—

**नारद**—भगवान् श्रीकृष्णाला असल्या निंद्य विशेषणांनीं संबोधणारा तूं कोणरे पापी प्राणी?

**पेंद्या**—अरे! हें कुठलें शेंडेनक्षत्र? आह्मांला शिकविणारे तुह्मी कोण हो? आमच्या कृष्णाला आह्मीं काय वाटेल तें ह्मणूं—त्यांत तुमचें काय वेचतें?

**नारद**—बाळा, भगवान् श्रीकृष्णाला—

**पेंद्या**—भगवान् श्रीकृष्ण?

**सुबल**—(प्रवेश करून) छेः! हा कृष्ण गेला तरी कुठें?

**पेंद्या**—अरे ए, आधीं ऐक हे काय ह्मणत आहेत तें. ह्मणे भगवान् श्रीकृष्ण! कसला भगवान्! आमचा कृष्ण काय रांडी दाढी मुंडण करून संन्यासी झाला आहे? कीं यांच्यासारख्या ज । दाढ्या वाढवून, भस्माचे

पट्टे ओढून त्यावर चंदनाचे टिळे मुद्रा ठेवून देतो ह्मणून त्याला तुह्मी भगवान् ह्मणणार ?

**सुबल**—मुनीवर्य, हा शुद्ध रानवट प्राणी आहे. याच्या बरळण्याकडे आपण मुळींच लक्ष्य देऊं नका. मुनिवर्यांना कोणत्या नांवानें अभिवादन करायचें ?

**नारद**—पण वत्सा, तुला कोणत्या नांवानें संबोधूं ?

**पेंद्या**—नको-नको-नको-नको—असल्या या साधु ह्मणवून घेणाऱ्या लोकांवर विश्वासायचा हा काळ नव्हे. दर्शनीं दिसतात बिनदांतांचे, पण मांजरीच्या मऊ पंजांतल्या नखांसारखे यांचे दांत मऊ दाढीखालीं छपविलेले असतात. दांतांच्या बनतात दाढा, जटेची होते सटा, विण्याची होते तरवार आणि हे साधु नसून नुसते कार्यसाधु असल्याचें उघडकीस येतें.

**सुबल**—पेंद्या, काय बोलतोस हें ? मनाची नाहीं पण कांहीं जनाची चाड ! मूर्ख कुठला !

**पेंद्या**—पेंद्या आपला मूर्खच ! त्याचें ऐकतें कोण ? अरे शहाण्या, कंसानें पाठविलेल्या पूतनेची आठवण आहेना ? केवढें दांडगें प्रेम दाखवीत होती ! पण आमचा कृष्ण कसला छट ! एवढें दांडगें प्रेम दाखविणारी कुणी तशीच दांडगी बायको--अर्थात् राक्षसी-असली पाहिजे असेंच त्यानें ताडलें. तसाच तो महाबळभटजी ! लेकाचें केवढें मोठें तें पागोटें ! ते भस्माचे पट्टे, त्या रुद्राक्षांच्या माळा ! कुणी ह्मणेल केवढा साळसूद ! पण कृष्णाचें भविष्य वर्तवितांना स्वतःच्या कपाळीं मुसळांचा मार होता हें कांहीं त्याला आधीं कळलें नव्हतें. तेव्हां कृष्णानें जसें पूतनेला रक्त शोषून मारलें, किंवा महाबळ राक्षसाला जसें उखळमुसळानें कांडून काढलें, तसेंच असल्या या लोकांना जळवा लावून आणि मुसळांनीं कांड कांडून मारिलें पाहिजे.

**नारद**—हाय भगवन् ! जो वेष साधुजनांना निर्भयपणें संचार करावयास कारणीभूत होत होता, तोच वेष या दुर्जनांनीं स्वीकारल्यामुळें सर्पानें चाखलेल्या दुधासारखा दूषित होऊन साधुजनांचे नित्यव्यवसाय खुंटत जावे ना ! बाळांनो, तुमची ही भीति व्यर्थ आहे. भगवान्-श्रीकृष्णाच्या या दासाला नारद ह्मणतात.

**पेंद्या**—कोण? कळलाव्या नारद! पळ--पळ, सुबल, या साडेसातीपासून दहा योजनें दूर राहिलें पाहिजे. हें शेंडेनक्षत्र जेथें आदळेल तेथें चक्काचूर उडवील!

**सुबल**—खरेंच महाराज, आपण या गोकुळापासून दूर असाल तेवढें बरें!

**नारद**—कां बाळांनों, कां बरें मला असा दूर लोटता?

**सुबल**—कां? काय महाराज, आपल्या कृति आपण फार लवकर विसरलांत असें वाटतें. तुमचा योग्य सन्मान राखणाऱ्या हरिश्चंद्रासारख्या सत्वशाली राजाच्यामागें विश्वामित्रासारख्या पिसाट ऋषीला लावून देणारे ते तुह्मींच ना?

**नारद**—पण शेवटीं त्यामुळेंच वसिष्ठविश्वामित्रांच्या पुण्यदानानें त्याची सत्वधीरता ठळकपणें जगाच्या निदर्शनाला आली ना?

**सुबल**—असेल-असेल. पण रावणाला चिथावून दाशरथीच्या लग्नांत विघ्न आणलें, पुढें उलट त्याच्याच करवीं पुन्हां सीतेला चोरायला लावून त्याची राखरांगोळी केली, हें देखील अगदीं योग्यच केलें ना?

**नारद**—बाळांनों, तर मग या परावलंबी दुर्जनांना सन्मार्गाचा उपदेश करावा असें का तुमचें ह्मणणें? अरे, हे दुर्बुद्धिकर्दमांत लोंळणारे, दुर्बुद्धीवर पोसलेले आणि दुर्बुद्धीनें वेढलेले! अरे वेड्यांनों—

(सरसमूलडेतंतुकू.)

**जडशिले जलीं न्हाणिलें। श्रम उगाचि करासि ते झाले**
**॥ धृ० ॥ शशांक बघोनि द्रवें रसें। मणीच, न काच**
**जशी, तसें। हितवच विफलचि जडा दिलें॥ १ ॥**

आधीं सुबुद्धीचा अंकुरच मुळीं यांच्या हृदयांत नसतो. तशांत तो उगवूं लागलाच तर यांच्या आसपास असलेले यांचे हितचिंतक ह्मणविणारे आपल्या विनाशकालसूचक स्वार्थपर उपदेशानें तो अंकुर जाळून काढितात. या दुर्जनांना उपदेश करायचा तो यांच्या नाशास कारणीभूत होईल असाच केला पाहिजे. सर्व अनुचरांसह यांचा समूळ विध्वंस झाल्याखेरीज अवताराचें कार्य पूर्ण होत नाहीं. जातीनें राक्षस असून भगवद्भक्त असल्या-

मुळें बिभीषणादिक वांचले, पण रावणाचा एक तरी अनुचर या पृथ्वीतलाला आपल्या कुश्चळ श्वासानें दूषित करायला जगला काय? माझ्या चिथावणीनें रावणानें आरंभिलेल्या छळाचा भवितव्यतेवर थोडा तरी उलट परिणाम झाला काय? दुर्जनांची ही छळ करण्याची प्रवृत्ति खरोखर भावी सुपरिणामाची द्योतक आहे. सीतेचा छळ हा रावणाच्या पापमालिकेंतील मेरुमणी! या एकाच कृतीनें रावणाच्या पापांचा घडा भरला, आणि संपूर्ण राक्षसकुलासह त्याची शेवटीं राखरांगोळी झाली. वत्सा, आतां तूंच सांग, यांत मी विपरीत तें काय केलें? हाच भगवान् श्रीकृष्णाचा अवतार पहा—

**पेंद्या**—पुनः भगवान् श्रीकृष्ण!

**सुबल**—भगवान् श्रीकृष्ण!

**नारद**—होय बाळानों, श्रीकृष्ण हा भगवंताचा पूर्णावतार आहे.

**सुबल**—काय? आमचा कृष्ण अवतारी पुरुष?

**पेंद्या**—चल सुबल, तूं काय ऐकतोस त्याचें! आमचा कृष्ण तो आमचाच कृष्ण! दुसरा कुणीहि नव्हे. आह्मांला ईश्वर नको आणि भगवानहि नको. आमचा कृष्ण कोण आहे तें आह्मांला ठाऊक आहे. सूर्य दाखवायला जशी दिवटीची जरूरी नाहीं, तसेंच हें सांगायला आह्मांला हे गोसावडे नको आहेत.

**सुबल**--चुप रहा पेंद्या; थट्टेनेंसुद्धां साधूंची अशी निंदा करूं नये, त्याचे परिणाम फार भयंकर होतात. ही अद्भुत गोष्ट आपल्याला नारद मुनींच्या मुखानें कळल्याचें सर्वांना कळविलें पाहिजे.

**नारद**--छे छे! वत्सा, भगवंताच्या लीला स्वस्थ चित्तानें अवलोकन करण्यासाठीं मी आज आलों आहें. माझ्या येण्याचा तुह्मीं असा डांगोरा पिटल्यास सन्मानाच्या उठाठेवींत मी माझ्या इष्ट कार्याला मात्र मुकेन. तसेंच गोकुळांत कुणी अवतारी पुरुष उत्पन्न होऊन आपला नाश करणार आहे, असें कळल्यावरून कंसाचें मन आधींच तुह्मां लोकांविषयीं कलुषित झालें आहे तशांत तुमच्या असल्या ओरडीमुळें ही गोष्ट कंसाच्या कानीं गेल्यास तो तुमचा अधिकाधिक छळ मात्र करील. तेव्हां सध्यां या विषयासंबंधें तुह्मीं कांहींच न बोलावें हें बरें.



**पेंद्या**:—असल्या लोकांना जळवा लावून आणि मुसळांनीं कांडकांडून मारलें पाहिजे. [ ६ ]

सुबल--जशी आज्ञा.

नारद--बरें तर. मी आतां येतों. मात्र मी स्वतः पुढें होईपर्यंत भगवान् श्रीकृष्णाला देखील मी आल्याचें कळवूं नका.

पेंद्या--चल-चल-त्या पहा गाई किती पुढें गेल्या त्या. आतां त्या कालिया डोहाकडे गेल्या तर एकहि गाय जिवंत परत यायची नाहीं. आणि तसें झालें तर कळलाव्या नारदाच्या पायगुणाचें हें पहिलेंच फळ होईल. अर्रर्र ! गेल्याच त्या तिकडे--पळ--पळ--पळ.

सुबल--अरे खरेंच. चल हो पुढें. ( पेंद्या जातो ) छेः ! आपल्याला आतां कांहीं वेळ तोंड लपविलें पाहिजे. कारण कृष्णासमोर आपल्याला कांहीं लपवून ठेंवतां येत नाहीं. आणि तसें झाल्यास साधूंची आज्ञा मोडल्यासारखें होईल. या पेंद्याचें काय ! कृष्णाला नुसतें पाहतांच सारें कांहीं विसरून जाईल. तेव्हां आतां कुठें तरी दडी मारावी झालें. ( जातो. )

नारद--( ऐकल्लेंसें करून ) वत्सा, ऐक ऐक. हेंच तें भगवंताच्या वेणूचें मधुर संगीत. पहा;-पहा--

( कांते बघ अंबरीं. )

वेणू मधुर ध्वनी । विपिनिं पसरे या । परिसुनि अचल
सकल झुलती, फुलती, फुलती तरुवर विकसित सुमनी
॥ धृ० ॥ नील सलिल यमुना । निजतनुसम हरितनु
बघुनी । परिसुनि मधुर निनद उसळे रमणी ॥ १ ॥

चल, चल वत्सा, आपणहि यांच्याच मागोमाग जाऊं ह्मणजे सहजींच आपल्याला भगवंताचें दर्शन घडेल. ( जातात. )

## प्रवेश दुसरा.

( कृष्ण प्रवेश करितो. )

कृष्ण—(मजा देले है क्या यार.)

स्वजीं भक्तांसाठीं लाज जागिं दास होउनि आलों ॥धृ॥०
निज मुखांतली बोरें । दे मज शबरी स्वकरें ॥

तीं सेवुनि निर्धारें । बहु तृप्त मानसिं झालों ॥ १ ॥
अतिबळी बळी छाळिला । करि तुष्ट दानिं मजला ॥
जरि पाताळीं नेला । तरि दास होऊनि ठेलों ॥ २ ॥
करितसें आतां चोरी । कुणि गवळण मज मारी ॥
जरि करी मला दूरी । तरि पाय चूरुनि घालों ॥ ३ ॥

या कुंजवनाची शोभा आणि माझ्या प्रेमळ मित्रमंडळाचा सहवास यानें मी तर अगदीं वेडा होऊन गेलों आहे. पण आज हे कुणींच कुठें दिसत नाहींत ते !

( पेंद्या प्रवेश करितो. )

**पेंद्या**--वाः कृष्णा ! तुला शोधावें तरी कुठें ? सारखा प्रहरभर फिरत आहें, पण तुझा थांग ना पत्ता !

**कृष्ण**--हें पहा पेंद्या, मी येथें आलों कीं नाहीं ह्मणजे देहभानच विसरून जातों. पहा, हें वृंदावन तुला रमणीय नाहीं का वाटत ?

**पेंद्या**--मित्रा, हें तुझें क्रीडारण्य, मग तें रमणीय कां बरें असणार नाहीं?

**कृष्ण**--वृंदावन रमणीय तर खरेंच--पण तुह्मां सर्वांचा सहवास मला त्याहूनही रमणीय वाटतो. अरे, पण तूं आलास आणि तो सुबल कुठें गेला ?

**पेंद्या**--आह्मांला पाहून देखील झुकांडी दिलीस वाटतें. टेहळणी चालली होती होय ?

**कृष्ण**--तसें नव्हे रे. ह्मटलें, थोडा लपंडाव खेळावा. पण तुह्मीं कसले वस्ताद ! मला शेवटीं शोधून काढलेंत ! पण सुबल कुठें आहे तें शेवटीं नाहींच सांगितेंस.

**पेंद्या**--तुला शोधित शोधित गेला असेल असाच कुठें तरी.

**कृष्ण**--आणि मधुमंगल देखील कुठें दिसत नाहीं तो !

**पेंद्या**--हा पहा तोच इकडे येत आहे. पण हा असा धांपा टाकीत कां येत आहे ? कृष्णा, यावयास उशीर झाला आहे त्यावर पांघरूण घालण्या-करितां स्वारीनें कांहींतरी कवित्व रचवून आणिलें आहेसें वाटतें

( मधुमंगल प्रवेश करितो. )

**मधु**--मित्रा, वांचीव रे वांचीव मला !

**कृष्ण**--अरे, पण असा घाबरलास कां ?

**मधु**--काय मित्रा सांगु तुला खचित तुझ्या पायाच्या पुण्याईनें आज वांचविलें. नाहींतर हा गरीब बिचारा ब्राह्मण आज तुझ्या दृष्टीससुद्धां पडला नसता ऐक तर खरें. एक थेरडी जख्खीण पांच पन्नास सुंदर पोरी गोळा करून घेऊन रस्त्यांतून चालली होती. मी ह्मटलें, ही चालली कुठें एवढ्या पोरी घेऊन ! मग आलें माझ्या ध्यानांत. ती त्या पोरी बळी द्यावयाला नेत असावी. ह्मटलें हिला असाच एखादा ब्राह्मणाचा मुलगाही हवा असेल ! मी आपलें सहज डोकावून पाहिलें हं ! आणि जेव्हां ती जख्खीण कीं नाहीं लागली आहे माझ्या मागें-मला वाटलें आतां मला देखील पकडून बळी देते ! मग मीं काय केलें असें तुला वाटतें ?

**कृष्ण**--यथेच्छ झोडपली असशील तिला ?

**मधु**--छेः रे ! जो सूंबाल्या ठोकला तो येथें आलों.

**कृष्ण**--मित्रा पेंद्या, हा वेडगळ कायरे ह्मणतो ?

**पेंद्या**--मी समजलों हा काय ह्मणत आहे तें. गोपीश्वराच्या पूजनासाठीं सर्व गोपिका वृंदावनांत येणार आहेत असें मी ऐकिलें होतें. तेव्हां मला वाटलें त्याच येत असतील ! हा जिला जख्खीण ह्मणत आहे ती वराई ! ( हंसून ) कृष्णा, तुला ठाऊकच आहे तें ! हल्लीं आमचे रमणराज त्या थेरडीला बरोबर दिल्याशिवाय राधेला बाहेर पडूंच देत नाहींत. आपल्याच प्रतापाचीं फळें हीं ! असेंच कीं नाहीं ! तेव्हां ज्या अर्थीं या आजीबाई येत आहेत त्याअर्थीं--काय ?

**कृष्ण**--काय बरें ?

**पेंद्या**--हं ! आतां कशाला सांगशील ! त्या अर्थीं श्रीमती राधेच्या स्वारीचें आगमन होत आहे.

**मधु**--वाः रे वाः ! मग आज मोठीच गंमत आहे ह्मणायची. हें पहा कृष्णा, आतां असें कर. तो शेला जरा सरसावून बांध, त्यांत तुझी ती वेणू

ठेवून दे खोवून ती तुझी एक अर्धांगीच आहे ह्मणायची. पण ती तुझीं चुंबनें घे घेऊन कंटाळली असेल तिलाही जरा विसावा मिळेल. ती गळ्यांतील पुष्पमाला जरा खुलून दिसेल अशी सांवरून घे. तो डोकीवरचा किरीट जरा अलबेला ठेवून दे. वाः! आतां छान जमलें! काय सांगूं कृष्णा तुला, मी जर कीं नाहीं राधा असतों तर यावेळीं तुझ्या गळींच पडलों असतों!

**कृष्ण**--वाः! आतांपर्यंत झाला हा तुझा गळेपडूपणा नव्हेच कीं काय? मी आपला सहजगत्या शेला सरसावून घेतला; हातांतील वेणू त्यांत खोवून ठेविली; पुष्पमाला जरा विखुरली होती ती सारखी केली आणि झाडाची डहाळी लागून वांकडा झालेला किरीट डोकीवर सारखा बसविला; तर माझ्या सहजीं होत असलेल्या कृतीला चारगटणानें तूं मेळ मात्र छान बसविलास. अरे, पण ह्या पहा त्या इकडेसच येत आहेत! आतां आपण सारे ह्या कुंजांत लपून बसूं चला. (तसें करतात व खालील पद ह्मणत राधा, ललिता आणि इतर गोपी व सर्वांच्यामागें वराई वगैरे प्रवेश करितात.)

( चालो साहेली. )

**वंदु चला या, अहिगणभूषा भूतेशा स्मरहरगौरा ॥ या**
**त्रिशुळधरा डमरुधरातें, मन्मथदहना इंदुधरा ॥ धृ० ॥**
**हिमनगवासी बसत उदासी सोडुनियां निज गिरिशिखरा।**
**प्रणय भक्तिनें भुलवुनि सतिनें नेलें ज्याला परत**
**घरा ॥ या गोपसुता तत्पदनिरता मागति आतां याचि**
**वरा। मधुमुरदमना यदुकुलरमणा त्रिभुवनशरणा देइं**
**वरा ॥१॥**

**पेंद्या**—काय कृष्णा, मीं सांगितलें तें खरें कीं नाहीं?

**कृष्ण**—वाः पेंद्या, तुझी बातमी का कधीं चुकीची असायची आहे?

**राधा**—काय ग ललिते, कुठली ग ही तुमची रीत? गोपीश्वराची पूजा करण्यासाठीं निघालांत आणि पूजेच्यापूर्वीच वर मागतां?

**वराई**—बाळे राधे, तूं अजून अजाण आहेस. पूजा करायची असो किंवा आराधना करायची असो त्याला काळवेळ किंवा परिमितपणा मुळींच नाहीं

वरप्राप्ति होण्यासाठीं म्हणजे कांहींतरी कामना धरून ईश्वराला भजायचें हाच तुमचा पहिला चुकीचा समज.

**ललिता**–पुरे पुरे हं आजीबाई, कळला तुमचा वेदांत. चल गडे राधे, आपण आतां पूजेच्या तयारीला लागूं. सगळें साहित्य आणिलें आहेस ना पण ?

**राधा**–खरेंच गडे, तेवढीं फुलें घ्यायला विसरलें.

**ललिता**–पण तूं आहेस ही. एवढें एकच फूल वाहिलें तर गोपीश्वराला केवढा तरी आनंद होईल !

**राधा**–झालें, आली बाई तुझी थट्टा पुढें ! पण आतां करायचें कसें ?

**ललिता**–अग, ह्या वृंदावनांत का फुलांचा दुष्काळ आहे ? चल आपण फुलें काढूं.

**राधा**–चल तर मग. (फुलें काढितात.)

**कृष्ण**–(राधेकडे पाहून) भक्तीच्या पूर्वरंगांत या माझ्या प्रेमळ भक्तांची काय स्थिती होते ही !

(जनक जरी त्या)

**सुमुखि जगतीं जरी विचरे । गणोनि विलास हे न खरे ॥**
**विमल वदना विकल हृदया । मजसिं चिंतीं न जाणुनिया ॥**
**प्रणयिं मजला जरी भावी । तरि न चुकते स्वकर्तव्यीं ॥**
**मधुर भक्ति जरी नकळे । कुसुमबाणें न मनहि जळे ॥१॥**

**मधु**–कृष्णा, अरे तुझें पुटपुटणें कसलें चाललें आहे ? वृंदावनाचा विध्वंस झाला तो दिसत आहे का तुला ?

**कृष्ण**—अरे जरा थांब. त्या पुढें काय करितात तें तरी पाहूं.

**वराई**—अग वेड्या पोरींनों, त्या कुंजाकडे नका जाऊं.

**ललिता**—तूं कोण ग आह्माला सांगणार थेरडे ? आह्मी वाटेल तिकडे जाऊं. चल ग राधे.

**चपला**—राधे, तूं तरी बाई तिकडे जाऊं नकोस.

( इष्क बडा जंजाल )

**कृष्ण असे कुंजात, गे नच जाई पुढारां ॥ धृ० ॥ वनचर त्याचे मित्र मिळोनी । सांगति जरि त्या आलिस म्हणुनि । छळिल तुला तो येईल ध्यानीं । तेव्हां ही मम मात । गे नच जाऊं पुढारां ॥ १ ॥**

**ललिता**—चलग राधे, तिचें तूं काय ऐकतेस. आपण या लवंगलतेची थोडीं फुलें काढूं.

**वराई**—आतां मात्र अगदीं कळस झाला. त्या लतेचीं फुलें कृष्णाला फारच आवडतात. नुसता जीव टाकील तो त्या फुलांसाठीं; तेवढीं तरी काढूं नका. जर कीं नाहीं एकदां त्यानं तुला पकडलें तर मग तुला सोडविणें मला फार कठीण जाईल.

**ललिता**—कांहीं नाहीं कठीण जायाचें बरें. तुला देऊं आम्हीं राधेच्या बदली आणि घेऊं तिला सोडवून.

**राधा**—खरेंच ललिते, मला त्या रानबैलाचें फार भय वाटतें.

**ललिता**—अग त्यांचें कसलें एवढें भय ? असें करितात तरी काय ते ! चल ये आपण फुलें काढूं. ( तसें करितात )

**मधु**—कृष्णा, पाहिल्यास का किती उद्धट पोरी आहेत त्या ?

**कृष्ण**—कां बरें ? काय केलें त्यांनीं ? मला नाहीं कळलें ?

**मधु**—तुला नाहींच कळावयाचें तें. तुझ्यासारखा मठ्ठ प्राणी ह्या साऱ्या त्रिभुवनांत नाहीं सांपडायचा ! तूं असा जर मठ्ठ नसतास तर नंद राजाचा मुलगा असून गाई राखायला कां आला असतास ? ह्या चहाटळ पोरी कुणाला रानबैल म्हणत आहेत समजलें कां तुला ?

**कृष्ण**—कुणाला ?

**मधु**—कुणाला म्हणजे ? आम्हांला-आम्हांला-तुझ्या अनुचरांना बरें का ? आपल्याना नाहीं बुवा हें खपायाचें :

**कृष्ण**—अरे उगी रहा. ह्या पहा फुलें वेंचित इकडेसच येत आहेत.

**चपला**—राधे तुला खरेंच सांगतें, अशीच जर आमच्या मर्जीविरुद्ध त्या कुंजांत जाणार असशील तर खरोखरच मी कृष्णाला हांक मारीन. नाहींच ना ऐकत तूं ? कृष्णा, कृष्णा, पहा हो ही राधा कशी तुझ्या कुंजाची नासधूस करीत आहे ती !

**मधु**—कृष्णा, आलीरे संधि तुला पुढें व्हायची. आयतें अप्रत्यक्ष रीतीनें तुला ही बोलवीत आहे. तुला प्रत्यक्ष बोलवायला कोण धजेल ह्मणा ? हं, हो, पुढें झालें.

**कृष्ण**—वेडा आहेस तूं मधु ! आधीं ही मजा पहा—

( सखे कोई शामसें )

**पहा फुलें वेंचिते विलोल करीं । करांगुली कोरकीं वि-**
**कास करी ॥ धृ० ॥ वलय ह्याचि भृंग सदा तेथें । गुं-**
**जारव सिंजित करी । त्याच करीं सुंदरी पूजि परी ॥१॥**

आतां पहा मी पुढें होतों, ह्मणजे ती कशी घाबरून जाते पहा. ( पुढें होऊन ) काय ग पोरींनों, काय चालविलें आहे तुह्मीं हें ?

( जावोजी जाव. )

**धरुनियां न मनिं भयासि उपवनिं या । रमत**
**सकलहि किती अविनयिं । करुनियां भंग मम**
**वन सकलहि ॥**

**चपला-उपवनिं तुज कुणि परिजन करि नच ॥ धृ० ॥**
**ललिता-लव घे मनिं विनया, भामिनिगणिं या,**
**त्रास न दे गात्रांसि कदा ।**

**राधा-जनपालननिरता । लालनपरता ।**
**भूषण देई विभूषणदा ॥**

**चंद्रा- त्यजितसां लाजकुलवधु मधुवच । कृति**
**अशि कटुतम अभिमत मज नच ॥१ ॥**

**वराई**—दूर व्हा ग मुलींनों, कृष्णा, तुमचा कुंज मोडायला कांहीं आह्मीं आलों नाहींत, समजलें. गोपिश्वराच्या पूजनासाठीं त्या मुली थोडीं फुलें गोळा करीत होत्या, इतक्यांत कुरण राखायला ठेवलेल्या कुत्र्यां-सारखे तुह्मीं वसकन अंगावर चालून येतां. कांहीं लाज नाहीं वाटत तुह्मालां ?

**मधु**--अग थेरडे, वयाबरोबर तुझी अक्कल जात चालली वाटतें ? ह्या अपराधाला काय दंड आहे ठाऊक आहे का तुला ?

**वराई**—अरे भटाच्या कारट्या, तुझी जीभ फार लांब झाली आहे वाटतें ? कसला अपराध ? आणि ह्मणे दंड आहे ! अपराधच नाहीं तर दंड कसला ? आणि तुह्मीं रे कसला दंड घेणार ?

**ललिता**—कायरे मधुमंगल, तुझ्या कृष्णाचें ह्या वृंदावनांत काय आहे रे ?

**मधु**—काय ह्मणजे ? वृंदावनाचा अधिकारिच तो !

**ललिता**--हो अरे खराच आणि त्यांतून अधिक ! नाहींतर येथें आ-मचा हा असा छळ कसा झाला असता ?

**मधु**—पण तुझ्या राधेनें तरी काय ह्मणून या वनांत यावें ?

**ललिता**--कां ह्मणजे ? स्वतःच्या वस्तूच्या उपभोगाला. आह्मीं येथें हक्कानें फुलें काढीत आहों. दिसत नाहीं का तुला ?

**वराई**—बरोबर सांगितलें ललितेनें. हें माझ्या राधेचें वन. तिनें या वनाच्या रक्षणासाठीं मुद्दाम येथें वृंदेची स्थापना केली आहे. आणि ह्मणू-नच याला वृंदावन नांव पडलें.

**कृष्ण**—वराई, रक्षण करायला ठेवली आहे ती वृंदा तुझ्या ह्या नातीची नोकर आहे वाटतें ?

**वराई**—यांत काय संशय ? वृंदेलाच विचारा.

**पेंद्या**-(कृष्णाला हळूच) कृष्णा, विचारशील हो तिला. बाकी ती आहे आपली दगडामातीचीच ! पण विचारलेस तर ती ह्यांचाच पक्ष घ्यायची ! किती झालें तरी ती बायकांची जात !



राधाः– पद– विनवणि करिं गुणनिधान ।

[२३]

**मधु**—भिऊं नको रे पेंद्या ! मीं त्यानां असलीं शंभर प्रमाणें काढून दाखविन. कायग ए ललिते, आमच्या कृष्णाची नाममुद्रा येथील प्रत्येक वृक्षावर आहे ती तुला दिसत नाहीं का ? आमचा येथील अधिकार शाबित करायाला एवढेंच प्रमाण बस्स आहे.

**ललिता**—असेल ! तरी पण आह्मीं कांहीं अपराधी ठरत नाहीं. पहा, येथील प्रत्येक लतेवर आमच्या श्रीमती राधेची नाममुद्रा आहे. तेव्हां अर्थातच आमचा येथील सर्व लतांवर पूर्ण हक्क आहे. आणि ह्मणूनच आह्मीं ह्या लवंगलतेचीं फुलें तोडणार !

**वराई**—शाबास ललिते, छान सांगितलेंस. कान्ह्या, अरे आपला अधिकार गाजवून दाखविण्यासाठीं विनाकारण कलह माजवून आपल्याबरोबर आमचा देखील खोळंबा कां करीत आहेस ? अरे तूं सर्वांचा आवडता, हीं फुलें मागितलींस तर कोणी तुला नाहींका ह्मणणार आहे ?

**कृष्ण**—( विचार करीत स्तब्ध राहतो. )

**राधा**—अहाहा ! दृष्टीबरोबर हृदय दिखील खिळून जातें !

( मारा तन मन. )

**आति ललित चलित कनकमुकुटिं बघुनि वदन वाटे ।**
**जलद् पटल गत अविचल बिजली चपल दाटे । विधु-**
**सम नव तिलक भाल प्रगट करि विशाल । दशन-**
**मुकुल बघुनि वरिल । उडुहि विफलतेतें ॥ १ ॥**

**वराई**—कायरे कान्ह्या, विचार कसला करतोस ? तुला फुलेंच हवींत ना ? हीं घे तर. ( राधेच्या ओंच्यांतील फुलें काढून कृष्णाच्या अंगावर फेंकते. )

**राधा**—( किंचित् ओढणी पुढें ओढून कृष्णाकडे पाहून सस्मित ) आजीबाई, काय केलेंत हें ? देवाच्या पूजेसाठीं काढलेलीं फुलें अशीं फुकट गेलीं ना ?

**कृष्ण**—पहा मधुमंगल, यावेळीं ही किती मनोहर दिसत आहे !—

( प्रणय तरंगा सवें. )

धरि वदनीं अंचला । चाळवी दृगंचला । पंजरीं चंचला ।
खंजनासि करि तुला ॥ धृ० ॥ लपत बघुनि विधुमुखा ।
हास्यकिरण दे सुखा । द्रव मृदु विधुचा निका । वस्त्रपूत
भासला ॥ १ ॥

ललिता—राधे, तूं यावेळीं फार घाबरलेली दिसतेस. कां बरें अशी घाबरलीस ? बाकी तेंहि खरें. एवढ्या श्रमानें काढिलेलीं सारीं फुलें फुकट गेलीं. यांचें आहे तरी काय बाई ह्या वृंदावनांत ?

वराई—ललिते, नसत्या ताठ्यानें तूं मुसमुसली आहेस तेव्हां तुला भांडणें उकरून काढावींशीं वाटतात. आह्मांला असल्या ह्या द्वाड पोरांशीं भांडणें नको आहेत. चल राधे, आपण घरीं जाऊं.

राधा—आजीबाई, गोपीश्वराची पूजा करायची आहे ना पण ?

मधु—अहो आजीबाई, चाललांत कुणीकडे? फुलें चोरल्याचा अपराध तुमच्यावर शाबीत झाला आहे; तेव्हां दान द्या आणि आपला रस्ता सुधारा.

वराई—कसलें रे दान चहाटळा ?

मधु—मित्रा पेंद्या, सांग, सांग या थेरडीला कसलें दान तें ?

पेंद्या—आजीबाई—

( धूला धूलनकी. )

कामें कुंजवनीं । केलें अधिकारी सत्ताधारी ॥ हरिपदिं
रमे । दे लावुनि यांतें । यम नियमातें ॥ धृ० ॥ जो न
विधेया । अर्पिल पाया । त्याप्रति वायां । जाऊं न दे ॥
मदन निजशरीं मारिल भारी कोणी न तारी तोचि
वदे ॥ १ ॥

वराई—असेल ! मग आह्मांला काय त्याचें ? आह्मीं कांहीं मदनाच्या आधीन नाहीं !

**मधु**—खरंच तें ! तूं झालीस आतां थेरडी, तुला कुठली आतां मदनाची ओळख ?

**वराई**—( रागानें ) कायरे तुमची कटकट ! सांगा काय तुह्मांला द्यायचें तें ! देण्याजोगें असेल तर देऊन टाकूं.

**पेंद्या**—कृष्णा, आतां काय तें तूंच सांग.

**कृष्ण**—आजीबाई अशा रागावूं नका. हे बेटे आहेत रानवट ! यांना वडील माणसांची मानमर्यादा कशी ठेवावयाची हें मुळींच समजत नाहीं.

**वराई**—कान्ह्या, तुझ्या उसन्या आवाला मी भाळायची नाहीं हो ! उगाच कशाला आह्मांला तिष्ठत ठेविलें आहेस इथें ! काय तें एकदां सांगून टाक पाहू.

**राधा**—काय बरें हें कृष्णा ?—

( अरे जवा दुला. )

किती तरि सदा सदा घेसि दान । लवभरि तरी दया
मनिं आण । कोप विषारी । सोडिं । मुरारी । तूं परि
असासि सुजाण ।। लवभरि० ।। धृ० ।। मम आशा
निराशा । राहि करीं तव । हा छल दानव । दानवनाश ।
सकलां, सुकुलां अवलां त्रास कृतिहि विपरित जाण ।।
लवभरि ।। १ ।।

**कृष्ण**—पुरे पुरे, त्या हातांतल्या पुटिका पहिल्यानें आमच्या स्वाधीन करा पाहूं ! हं मधुमंगल—

**चंचला**—अरे मधु—हीं गोपीश्वराच्या पूजनासाठीं आणलेलीं उपकरणीं—

**मधु**—( कृष्णाकडे बोट करून ) मग हाच नव्हे का गोपीश्वर—

**चंचला**—अरे महाकाल गोपीश्वर—

**मधु**—हा नव्हे का महाकाल ? पहा, याच्या रुचिपटलानें सर्व वन तमाल वर्ण झालें आहे.

**चंचला**—अरे, चंद्रशेखराची पूजा करायला—

**पेंद्या**—पहा पहा हा चंद्रशेखर नव्हे का ? ( कृष्णाच्या किरीटावरील मयूरपिच्छावतंस दाखवितो. )

**ललिता**—अरे चाहटळा, गौरीपतीची पूजा करतों आम्ही.

**मधु**—तुम्हींच नाहीं का गौरी ?

**वराई**—अरे पोरा, यांचा पति का तुझा कृष्ण ? थांव तूं गांवांत न तोंड दाखीव !

**चंचला**—अरे गोपीश्वर म्हणजे पशुपती—

**पेंद्या**—वारे वाः एवढ्या गाई पाळतो तो पशुपती नव्हेच की काय ?

**ललिता**—होय हं ! तुमच्यासारखे पशु ज्यानें पाळिले आहेत तो तर खराखुरा पशुपती !

**मधु**—तसें कां होईना ! आम्ही सर्व पशु ! मग तरी तो पशुपती ठरतो ना ? आतां करा त्याची पूजा. काय आहे तें दाखवावें—सुखानें जावें तें सोडून निरर्थक वादविवाद कशाला हा ?

**राधा**—अग ललिते, दाखीव त्यांना काय असेल तें. ( ललिता सर्व पूजेचें साहित्य आणून त्यांच्यापुढें ठेविते.)

**मधू**—हा कापूर—काय जाळायचा आहे ? हें कुंकुम—वाः या बायका शंकराला देखील बायको बनवूं लागल्या वाटतें ! हा मृगमद-कृष्णा हा—तुझ्या उटीची तयारी ! आणि हें चंदन—चंदनाशिवाय कृष्णाचे मुळी चालायचेंच नाहीं. छेः चंदन नाहीं दिलेत तर तुमचे चंदन झालेंच म्हणून समजा ! आणि ही वनपुष्पांची माला—

**कृष्ण**—हं हं आण ती इकडे.

**मधु**—अं हं—तशी नाहीं मिळायची ती—अहो, राधावहिनी, ही माळ घा कृष्णाला.

**राधा**—चल मधु, असें काय भलतेंच बोलावें बरें !

ललिता--आणि तो पहा कारटा--कसा बघतो आहे तो ! मेल्याला शरम सुद्धां वाटत नाहीं. स्त्रीलंपट मेला !

कृष्ण--अग मी स्त्रीलंपट असलों तर काय नवल ? हे निर्जीव मेघ पहा

( तेरो रतनकोतन मेरो मन. )

जलनत नव घन विचरति नभांत। अचल पटल धरिति
विधुवरि वितत॥ धृ० ॥ उत्कंठित हलुहलु अवगुंठित
कृष्ण वसनहि करुनी दुरी। आकलीती चपला विमला
सहजचि करांत॥ १ ॥

ललिता--अगबाई, पाऊस आला वाटतें ! कृष्णा आतां असा किती वेळपर्यंत तूं आह्मांला नाडणार ?

( अभिमान वृथा मनुजाचा. )

तुझी खोड कशी नच जाई। उपरती कशी तुज होई।
कळे नच कांहीं॥ धृ० ॥ दुःखमूल ही सकलां होई।
सवय वरी नच सोड ॥ १ ॥ नडतें आतां बालपणीं
जें केलें तव बहु कोड ॥ २ ॥

राधा--ललिते, कशाला आतां त्यांच्याबरोबर वितंडवाद माजवीत आहेस ? साहित्य तर सर्व त्यांनीं विटाळवून टाकलें. घेऊं दे तें त्यांना. आपण आतां घरीं जाऊन नवीन साहित्य घेऊन येऊं. आजीबाई, चला आपण घरीं जाऊं.

कृष्ण--हे चतुरमन्ये, कुठें चाललीस ! अगोदर दान दे.

राधा--कृष्णा, मूळच तुला दिलें, आतां दान कसलें मागतोस !

कृष्ण--मूळ दिलें ! तें केव्हां ? अपराध चोरीचा--चोरी केलीस तूं तेव्हां दानाचें मूळ तुझी तूंच नव्हेस काय ?--

( असुवा भरे मोरे नैन. )

केलें नाहीं आत्मदान। कैसे मूल दत्तमान ॥ धृ० ॥
मूल जगाला मीपणा सोडी त्यातें या क्षणा ॥ उमज
तशी गे आपणा भाव मनीं हा आण ॥१॥

दान-दान दे अगोदर. अरे पेंद्या, मधुमंगल तुह्मीं दोघे असे दोन्ह बाजूला उभे राहून रस्ता अडवून धरा. मी हा इकडे आहेंच.

**मधु**—कृष्णा, त्याची नको तुला काळजी. मी हा असा एकटाच या रस्त्याच्या तोंडावर उभा राहिलों तर एका मुंगीचाही प्रवेश होऊं द्यायचा नाहीं. आणखी कांहीं दिवस तुझ्या आश्रयास राहून असाच दहीदुधाचा खुराक चालू ठेवीन तर या तुझ्या दानवटिकेचा भला अगडबंब दरवाजाच बनून जाईन. पेंद्या, बावळटासारखा पहात काय राहिला आहेस ?

**पेंद्या**—ह्या माझ्या वांकड्या पायांचा रस्ता अडवायला कसा उपयोग करून घ्यावा ह्या विचारांत आहें.

**मधु**—वाः तुझी तर उत्तमच सोय आहे. मुद्दाम पाय पसरून धरायला नकोत. तुझ्या ह्या वांकड्या पायानें तुझ्या पुष्ट शरीराला चांगलीच जोड दिली आहे ह्मणावयाची !

**कृष्ण**—आतां ठीक जुळलें. हं, आतां दे दान.

**राधा**—आतां करूं तरी काय बाई ? ( रडूं लागते. )

**कृष्ण**—( बाजूस होऊन ) अं ! हें काय ?—

( उतरोनि भूवरि. )

**चपलाक्षि मंजुल बाले । कां मुख म्लान हें तव झाले**
**॥ धृ० ॥ सदाहि विधुसम । कदा न उपरम । यदा**
**करित शम । हृदा नलिनि सम । केवीं या मम बोलें ॥१॥**

**वराई**—( पुढें होऊन ) अरे कान्ह्या, असा चढेल होऊं नकोस. निष्कारण लोभाला बळी पडून पदरांत पाप कां बांधतोस ? माझें ह्मातारीचें हें सांगणें ध्यानांत ठेव कीं, जर तूं ह्या बिचाऱ्या कुलवधूंना असें नाडशील तर कधींहीं तुझें कल्याण होणार नाहीं.

**कृष्ण**—आजीबाई, अशा रागावूं नका. मी यांना सांगत आहें, ती यांच्या कल्याणाचीच गोष्ट आहे. पहिल्यानें दान दिल्याशिवाय माझ्या स्थानांत प्रवेश होणें अशक्य आहे.

**वराई**—तूं नकोरे बोलूं. तुझा मला असा तिटकारा येतो कीं, तुझ्याकडे पहावेंसें देखील वाटत नाहीं.

**कृष्ण**—तर मग आपल्या हृदयांत पहा.

**वराई**—पहातें हं ! आधीं जाऊन तुझ्या आईला सांगतें आणि मग येतें हं पहायला. (रागानें जाते.)

**मधु**—कृष्णा, आतां असा कितीवेळ तिष्ठत बसणार ? सामदामानें ह्या ऐकावयाच्या नाहींत, आतां आपली पांसष्टावी कला पुढें आण पाहूं.

**पेंद्या**—बोल बोल कृष्णा, आतां यांना काय शिक्षा करूं बोल.

( राधा जाऊं लागते. कृष्ण तिला अडवितो. )

**राधा**—मी तुझ्या पायां पडतें—नकोरे असा छळूं. गोपीश्वराची पूजा हें केवळ निमित्त. आह्मीं येथें येतो ह्याचें कारण निराळेंच आहे—आतां एवढें एक ऐक—

( जिन पिया जिया. )

**विनवाणि करिं गुणानिधान । तुजविण हा विकल**
**प्राण । मुरलि गान । हरवि भान ॥ धृ० ॥ ह्मणुनि**
**सकल येति विपिनिं । न करि विफलजनन रमणी ।**
**चरणिं शरण सुखवितान ॥ १ ॥**

**कृष्ण**—ठीक आहे राधे. तुझ्या शब्दाला मान देऊन मी सर्वांनां आज एकवार सोडतों. पण मी सांगेन तसें मात्र केलें पाहिजे.

**राधा**—तें काय बरें ?

**मधु**—कृष्णा, कांहीं तरी बिकटसें शोधून काढ. यांना ह्मणावें लोटांगणें घालीत मथुरेच्या बाजारापर्यंत चला. ह्मणजे यांचा सौंदर्याचा गर्व चांगला धुळीस मिळेल.

**पेंद्या**—छेः छेः कृष्णा तसें नको. यांना ह्मणावें मी केव्हां केव्हां राहतों तसेंच कीं नाहीं खालीं डोकें वर पाय करून एक प्रहरभर उभ्या रहा.

ह्मणजे यांच्या हाडींमाशीं खिळलेला अभिमान केंसावाटे उतरून जमिनदोस्त होईल.

**कृष्ण**—बस्स करा रे वात्रटपणा. राधे. आज तुह्मीं सर्वांनीं शिस्त मोडून माझा फारमोठा अपराध केला आहे. तेव्हां माझें गुणानुवाद गाऊन मला नृत्य करून दाखवावें अशी मी तुह्मांला शिक्षा सांगतों.

**राधा**—काय ललिते, ऐकलेंस ना ?

**ललिता**—मग तरी होईल का मोकळीक ?

**कृष्ण**—हो अलबत होईल.

**ललिता**—आलें खरें आतां कपाळीं. चला ग साऱ्या जणी—

( पियारि चालो. )

या चला मोहूं यातें । विलासयुता नाचुं गाऊं येथें ।
सकला या पदाघातें ॥ धृ० ॥ कुंजवनीं गोपगणा तारी
मुरारी । गोकुलिं या वागे विहारी ॥ विलासरासरंगीं
विमोहि श्याम । असुरहरण कारि विहरण जो हरि
या जाला । भवजाला; कलिकाला । व्यालातें ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

## ( अंक पहिला समाप्त. )





ललिताः—कृष्णा, दूर हो आधीं ! [३६]

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

( यशोदा आणि वराई प्रवेश करितात. )

**यशोदा**—वराई, मलातर वाटतें कीं, तुमचीं कृष्णावर हीं सारीं कुभांडें आहेत. त्याचें वय तें काय आणि त्याच्यावर आरोप ठेवतां ते काय?

**वराई**—हो, तुह्मांला कुभांडेंच वाटावयाचीं! जगाची रीतच अशी आहे मुळीं. लोकांच्या डोळ्यांतलें कुसळ दिसतें पण आपल्या डोळ्यांतलें मुसळ देखील दिसत नाहीं. हाच कृष्ण जर माझा मुलगा असता तर तुह्मींच केवढा आकांत केला असता. झालें, सांगावयाचें ह्मणून ह्मटलें होतें तें सांगितलें. आतां काय वाटेल तें करा. चढवून ठेवावयाला किंवा शिक्षा करावयाला तुमच्या तुह्मीं मुखत्यार आहां. पण मी ह्मणतें, तुमच्या मुलाला जर तुह्मीं शिस्त लावावयाची नाहीं तर लावावयाची तरी कुणी?

**यशोदा**—अशा रागाऊं नका बाई. पोरवय आहे तेव्हां त्याचेकडून कमी जास्ती हूडपणा हा व्हावयाचाच. पण काय सांगूं तुह्मांला—

( मनिं कोप नका ठेऊं. )

**निज नेत्रगुणें ओढी हा सकलांतें । धरूं हृदयीं वाटे त्यातें ॥ धृ० ॥ करूं केंवि तया शिक्षा मी वाटतें । मनीं दाटते । मूर्ति ती । भाना विसरवीते ॥ १ ॥**

**वराई**—तर मग आह्मांला आतां गोकुळ सोडून कुठें तरी परदेशीं जाऊन राहिलें पाहिजे.

**यशोदा**—अहो! पोरांच्या पोरखेळांनीं कुणीं गांवें ओस पाडलीं आहेत काय? काय तरी बोलतां हें?

**वराई**—हे काय पोरांचे पोरखेळ? अहो, गोकुळांतलीं सारीं मुलें यानें बिघडवून टाकलीं. पाळण्यांतून बाहेर पाय ठेवलेलें प्रत्येक कारटें याच्या

संगतीनें जगाच्या कल्याणाच्या गोष्टी बोलूं लागलें आहे. याची बुद्धि तर मुळचीच भ्रष्ट आहे. हा राजाचा मुलगा. याला कोण वाकडें बोलणार ? पण आमचीं गरिबांचीं पोरें जर अशीं बुद्धिभ्रष्ट झालीं तर आमचे धंदे उदीम चालावे कसे ?

**यशोदा**—मग मी आतां करूं तरी काय ?

**वराई**—आतां सांगावयाचें तरी किती वेळ ? अहो, याची बुद्धि पालटली तर इतरांची धडगत. तेव्हां ह्मणतें तुह्मीं संकष्टचतुर्थीचें व्रत केल्याशिवाय या कृष्णाची बुद्धि कांहीं ताळ्यावर यावयाची नाहीं.

**यशोदा**—तुह्मीं परवां सांगितलें तें मी विसरलें नाहीं बरें का ? आजच चतुर्थी ना ? सारी पूजेची तयारी करून ठेवली आहे. आतां चंद्रोदयाची वाट पहात होतें इतक्यांत ह्या तुह्मी आलां—

**कृष्ण**—(घाईघाईनें प्रवेश करून) आई, आई आधीं इकडे देवघरांत ये पाहूं.

**वराई**—आला मेला चवचाल कारटा. मी आलें कीं आलाच मेला आड. मेल्याला जसें कांहीं स्वप्नच पडतें.

**यशोदा**—बाळ, या वेळीं देवघरांत काय आहे ?

**कृष्ण**—काय सांगूं आई, आतांच कीं नाहीं देवघरांत एक हजार उंदीर आले होते.

**वराई**—काय पण कुक्कुबाळ बोलत आहे !

**यशोदा**—एक हजार उंदीर ? चल वेडा कुठला !

**कृष्ण**—एक हजार कां ? एक लाख—नव्हे नव्हे एक कोटी—हो एक कोटी उंदीर आले होते. त्यांत एक जो उंदीर होता तो—केवढा बरें ? हो—बैलाएवढा होता—

**वराई**—हाच आहे मेला बैल !

**यशोदा**—भलतेंच काय बोलावें बरें बाळ ! उंदीर कुठें बैलाएवढा असतो का ?

**कृष्ण**—बैला एवढाच कां आई—उंटाएवढा होता ह्मणेनास. कां बरें आई, उंटाएवढा उंदीर तूं कधीं पाहिला नाहींस ?

**यशोदा**—बरें. उंटाएवढा—पण त्यानें केलें काय तें तरी सांगशील ?

**कृष्ण**—त्या उंदराच्या—ह्मणजे त्या मोठ्या उंदराच्या पाठीवर एक डोंगराएवढा मनुष्य बसला होता—

**वराई**—काय मेल्याची जीभ वळवळते आहे पहा !

**कृष्ण**—आणि त्याचें तें नाक !--अबबब, किती लांबचलांब होतें ह्मणून सांगूं !

**वराई**—सांग सांग आपल्याच जिभेइतकें ह्मणून. कुणी तोंड का धरलें आहे तुझें ?

**कृष्ण**—अगदीं लांबच लांब होतें. आणि त्यानें त्या नाकाचें एक टोंक देव्हाऱ्यापुढच्या नैवेद्याच्या परातींत हळूच सोडून दिलें. आणि त्यांतला एक लाडू अलगत उचलून घेतला. त्याच नाकाखालीं किं नाहीं एक झालर लावलेलें भोंक होतें—तें त्याचें तोंड काय ग ताई ?—

**वराई**—काय पण साळसूदपणा दाखवीत आहे मेला--कुणी ह्मणेल अझूनपर्यंत पाळण्यांतच खेळत आहे !

**यशोदा**—असेल—असेल—( स्वगत ) श्री गजाननच नव्हे ना तो ? काय माझ्या बाळाचें भाग्य तरी ! प्रत्यक्ष गणपतीचें दर्शन सहजासहजीं घडलें !

**कृष्ण**—आणि तो उचललेला लाडू त्यानें त्या तोंडांत हळूच फेंकून दिला.

**वराई**—अहो, त्याचें काय ऐकतां ? स्वतःच लाडू गिळंकृत करून तुह्मी रागे भराल ह्मणून कांहीं तरी बतावणी करीत आहे झालें ! आमच्याकडे सुद्धां अगदीं अशींच कांहींतरी ढोंगें करीत असतो.

**यशोदा**—खरें सांग. कृष्णा, तूंच नाहींना त्यांतला लाडू घेतलास ?

**कृष्ण**—एकच गेला तर घे माझ्यावर आळ—अग, एकुणएक लाडू त्या मोठ्या पोटाच्या माणसानें आणि त्याच्या त्या उंदरांनीं फस्त करून टाकले.

**यशोदा**—थांबा अं बाई, हा काय ह्मणत आहे तें आधीं पाहून येतें.

**कृष्ण**—चल, चल, अगोदर आई. ( दोघें जातात. )

**वराई**—काय तरी विचित्र बाळ आहे हें ! घरीं पाहिलें तर कुणी ह्मणेल अगदीं गरीब बिचारें भोळें लाघवी पोर—तिकडे कुंजवनांत गेला म्हणजे मेला नष्ट चांडाळ त्रासदायक कारटा—कधीं दरबारांत पाहिलें तर कुणी म्हणेल मोठा न्यायपंडितच--आणि तिकडे यमुना नदीच्या तीरावरच्या त्या दाढीवाल्या ब्राह्मणांकडे गेला ह्मणजे एखाद्या परमहंसाचाच आव आणतो ! काय मेल्याकडे रंग ढंग भरले आहेत कोण जाणे ! अगबाई, किती वेळ झाला यांना जाऊन हा ! अझून करीत आहेत तरी काय ? जेव्हां जेव्हां ह्मणून कांहीं सांगावयाला यावें तेव्हां तेव्हां हा मेला दुष्ट कारटा हटकून अडथळा आणतोच. रात्र फार झाली. आतां घरीं जावें. येऊं पुन्हां केव्हां तरी. नाहींतर—असें नको. पुरुष मंडळीकडूनच ही फिर्याद नंदमहाराजांकडे नेवविली पाहिजे. या बायका बायकांच्या सांगण्याऐकण्यांत कांहीं निष्पन्न व्हावयाचें नाहीं. ( जाते. )

**यशोदा**—( प्रवेश करून ) काय तरी विलक्षण चमत्कार तो ! लाडू खाल्ला कीं काय हें पहाण्यासाठीं ह्मणून कृष्णाला तोंड उघडावयाला सांगितलें तों, काय तरी आश्चर्य—

( सखी विलंबा न करी. )

**जशि रवीची सलिलीं प्रभा। लघु घटिं दिसे विशदा प्रतिभा। तशि लघु मुखांत अपार शोभा ॥ धृ० ॥ प्रति- घटिं नव नव बिंब विनटलें। मूळ जरी तें एकचि अस- लें। वदनिं जग तसें भरलें सगळें। पाहे सुरलोका सुतल नभा ॥ १ ॥**

पण हा कृष्ण गेला तरी कुठें ? पुन्हां एकवार तरी तो चमत्कार पहावयाला मिळाला असता तर माझ्या मनाचें किती तरी समाधान झालें असतें. खरेंच माझ्या बाळाच्या या लीला पाहून केव्हां केव्हां मला तो प्रत्यक्ष परमेश्वरच आहे कीं काय असें वाटतें. पण ह्मणतात ना तसें आहे. प्रत्यक्ष आईला आपलें मूल

ह्मणजे रत्नांतलें रत्न—हिऱ्यांतली हिरकणीच वाटत असते. ( पाहून ) अगबाई, येणें झालें वाटतें ?

**नंद**—( प्रवेश करून ) देवी यशोदे, तूं खरोखर धन्य आहेस. आज नारद मुनींची स्वारी येथें आली आहे—

**यशोदा**—खरेंच का ? मग मला नाहीं कुठें कळवावयाचें तें ? मला त्यांचें दर्शन घडूं नयेच कीं काय ?

**नंद**—सध्यां त्यांचें वास्तव्य येथेंच आहे. तेव्हां दर्शन हें घडेलच; पण त्यांनीं मला आज जें एक अद्भुत रहस्य सांगितलें तें ऐकून मी तर अगदीं बधिर होऊन गेलों आहें. काय सांगूं—

( धाडुनि दिधलें. )

**तोषुनि धालों कीं घाबरलों हेंचि मला समजेना । विगलितधी मी पुलकित झालों शब्द मुखींचा उमटेना ॥ ध्रु० ॥ काय असें म्यां कोठिल जन्मीं महाव्रततें आचरलों ॥ काय तपानें किंवा दानें देवातें कोण्या भजलों ॥ पुण्यसमुच्चय संचित कैंचा भोगाया आजाचि सजलों ॥ नित्यनिरामय भगवंतें कां धन्य करावें उमजेना ॥ १ ॥**

**यशोदा**—असें झालें तरी काय ?

**नंद**—काय सांगूं तुला यशोदे, तूं खरोखर महाभाग्यवती ह्मणून श्रीशेषशाई भगवंताची माता झालीस.

**यशोदा**—काय ? भगवंताची माता ?

**नंद**—होय. श्रीनारदमुनि काय ह्मणाले तेंच तुला सांगतों ऐक—

( दिंडी. )

**कृष्ण चिद्घन खेळतो गृहिं तुझ्या जो ।**
**पाहुनी त्या खर दनुज कुमति लाजो ॥**
**परात्पर केवळ धाम चित्सुखाचें ॥**
**तेंचि बालक हें सदनिं तुझ्या नाचे ॥ १ ॥**

**यशोदा**—काय माझा कृष्ण ईश्वराचा अवतार ? छेः नाहीं ग बाई ! ईश्वर केवढा मोठा ! माझा लाडका कृष्ण किती गोजिरवाणा, असे शंभर ईश्वर त्याजवरून ओंवाळून टाकावे !

**नंद**—यशोदे, कृष्णाचा मोह आतां हळुहळु तोडीतच गेलें पाहिजे. दुष्टांचा संहार करून जगाचा उद्धार करण्याकरितांच त्याचा अवतार आहे. सर्व जगताला अज्ञेय अशा विश्वरूपांतून सर्वांना ज्ञात होण्याजोगें हें मोहक स्वरूप त्यानें धारण केलें आहे. अहाहा !

( निर्झर तरु मंदिरादि. )

**दावुनि मृदु मंद हास मोह उपजवी मनीं । स्तब्ध वृत्ति शब्द गोड थोडकेहि परिसुनी ॥ धृ० ॥ आलिंगुनी कवटाळुनि वाटतें सदा मनीं । हृदय चिरुनि अंतरीं तयासी देउं ठेउनी ॥ १ ॥**

**यशोदा**—पण मी ह्मणतें, असें जर आहे तर गोकुळांतले लोक त्याच्या विरुद्ध एवढ्या फिर्यादी कां बरें आणतात ? आतांच ती वराई आली होती, कृष्णाविषयीं काय काय ह्मणून सांगत होती—ऐकवेना देखील.

**नंद**—ही तर जगाची रहाटीच आहे. वयानें किंवा अधिकारानें श्रेष्ठ असलेल्या दुर्बल माणसांना आपल्यापेक्षां कमी वयाचा, पण अधिक योग्यतेचा मनुष्य चमकूं लागला तर तें सहन होत नाहीं. कृष्ण सर्वांचा आवडता होत चालला आहे हें पाहून स्वतःच बावळे असलेल्या ह्या गोपांना त्याच्या तेजाचें वैषम्य वाटूं लागलें यांत कांहीं नवल नाहीं. काकदृष्टीनें त्याचे दोष शोधून काढून कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें राईचा पर्वत करून कमीपणा आणण्याचा अट्टाहास ते करणारच.

**यशोदा**—काय दुष्ट लोक आहेत हे ! मला नव्हतें बाई हें ठाउक !

**नंद**—हा पहा, कृष्णच इकडे येत आहे. अहाहा !—

( दोलनु मेंढे घर आये. )

**कोमल पायीं हलु चाले। वाटे भूमी घेई या हातें उचली मोहें ॥ धृ० ॥ मृदुपदा दे भू भारा साही निजमनिं जाणोनी मग डोळे ॥ १ ॥**

**कृष्ण**–( प्रवेश करून ) हा आतांचा प्रसंग कांहीं निराळाच आहे. आज नारद मुनींनीं आमचें रहस्य बाहेर फोडलें आहे आणि त्यामुळें आई आणि बाबा यांचें मन अगदीं बावरून गेलें आहे. अशा वेळीं मी पुढें जाणें ह्मणजे त्या उभयांची समजून उमजून त्रेधा उडविण्यासारखें होय. तसेंच अझून कांहीं दिवस यांना अज्ञानांत ठेवणेंहि अवश्य आहे. तेव्हां आतां आपलें मायेचें अस्त्र सोडल्याखेरीज पुढें जाणें चांगलें नाहीं. ( पुढें होऊन ) आई आई, काय सांगूं तुला ! मी आतांच यमुना नदीच्या तीरावर गेलों होतों.

**यशोदा**–माझा बाळ तो ! यमुनेच्या कांठीं जाऊं नये बरें बाळ.

**कृष्ण**–मी तेथें एक मोठा साप पाहिला. तो किती छान होता ह्मणून सांगूं !

**यशोदा**–अग बाई ! कालियाच तो !

**नंद**–( रागानें ) कृष्णा, यमुनाकांठीं जाऊं नकोस ह्मणून तुला किती वेळां बजाविलें होतें ? तुझा हा हट्टी स्वभाव आतां जाणार तरी केव्हां ? तूं कांहीं आतां लहान नाहींस.

**कृष्ण**–पण मी दुरूनच पहात होतों बाबा, फारसा पुढें गेलों नव्हतों.

**नंद**–दुरूनसुद्धां पहावयाचें नाहीं, समजलें. यापुढें तूं तिकडें गेल्याचें जर मला कळलें तर अशी शिक्षा करीन कीं चांगलीच आठवण राहील.

**कृष्ण**–कां बरें बाबा, तिकडे कां जाऊं नये ?

**यशोदा**–लहान मुलांनीं सांगितलेलें ऐकावें. कारणें विचारूं नयेत, समजलें ?

**कृष्ण**–आजपासून जावयाचा नाहीं, मग झालें ना ! पण आई कालिया काय करतो तें एकदां मला पहावयाचें आहे.

**यशोदा**–असें काय बरें बाळ, नको ह्मटलें जाऊं नये. भलताच हट्ट करणें तुला शोभतें का ?

**मधु**–( प्रवेश करून ) कृष्णा घात झालारे घात झाला. ( नंदाला पाहून चपापून ) अर्रर्रर्र, महाराजानीं ऐकलें वाटतें !

**नंद**—काय झालेंरे मधुमंगल ?

**मधु—नाहीं**—कांहीं नाहीं—आमची आपली ती खेळांतली गंमत !
( कृष्णास हळूच ) कृष्णा, असा इकडे ये पाहूं अगोदर.

**कृष्ण**--आई, मी जातों खेळावयाला. मधां मध्येंच खेळांतून निघून आलों होतों ह्मणून हा मला बोलवावयाला आला आहे.

**नंद**--पण तिकडे डोहाकडे जाऊं नका बरें.

**कृष्ण**--आतां एवढें सांगितल्यावर जाईन का मी ? असा कांहीं तुह्मांला अगदीं नकोसा झालों आहे की काय ?

**यशोदा**--बाळ, असें अभद्र बोलूं नये. मधुमंगल, कृष्णाला संभाळून ने अं ! डोहाकडे जाऊं देऊं नकोस आणि तूंहि पण जाऊं नकोस हो. नाहींतर मुलें मुलें जमाल आणि जाल तिकडे, झालें.

**मधु**--छेः छेः आईसाहेब, त्याची नको तुह्मांला काळजी. मुलें असलों ह्मणून काय झालें, आह्मांला आमच्या जिवाची पर्वा नाहींच कीं काय ?

**यशोदा**—अरे, तुह्मीं आहांच तसे सुजाण मुलगे. पण आईचें हृदय आहे ना ? ह्मणून सांगितल्यावांचून राहवत नाहीं. कृष्णा, जा आतां पण लवकर परत ये. त्या गोपींच्या वाटेस जाऊं नकोस.

**नंद**--चल यशोदे. ( दोघे जातात. )

**मधु**—ह्मणे कृष्णाला संभाळून ने ! सर्व जगाला गिळून बसलेला हा, याला कसलें कालियाचें भय ?

**कृष्ण**—काय मधू, काय गडबड आहे ?

**मधु**—घात झाला कृष्णा. तूं इकडे आलाससें पाहून त्या चोरट्या गोपी दान दिल्याशिवाय मथुरेच्या बाजाराला चालल्या आहेत.

**कृष्ण**—काय दान दिल्याशिवाय ? माझ्या वाटिकेंत दान दिल्या-शिवाय प्रवेश ?

( कोयलिया कूंकै सुनावे )

**या विपिनिं जाति कुमारी। पडति किती सहज विकारीं।**
**स्मरति न हृदयिं मुरारी । जनिं गतभय परि लपलि**



रमणः—अँ ! हें काय ! जारकर्माचा हा अद्भुत देखावा [३९]

M P W

छपाति सभय किति मनिं या परी ॥ धृ० ॥ रचिति अमित
धन विकुनि गोरसा । परि नच मजला अल्पाहि देति ।
विभावें विगत माति मम पदिं नच रति पडति कारीं ॥१॥

(पडदा पडतो)

## प्रवेश दुसरा.

(ललिता प्रवेश करते.)

ललिता—होय कृष्णच तो. तरी बरी मीं त्याच्या तावडींतून निसटलें. जर का मला त्यानें पाहिलें असतें तर मात्र माझी धडगत नव्हती. पण, या मेल्या पेंद्याला आतां शोधूं तरी कुठें? बाबा ह्मणाले मेला वांकडा कुठें तरी खड्ड्यांत पडला असेल, आणि मला अशा या काळोखांतून त्याला शोधून आणावयाला सांगितलें. काय तरी बाई हा काळोख! आणि त्यांतून हा पाऊस! आणि मी तर ही अशी एकटी. आतां काय करावें बाई! अशावेळीं जर का तो मेला काळा कुठें भेटला तर—

(लो फूल जानीं लेलो)

मज आडवील रानीं । कर दोन्हिही धरोनी ।
रानीं दानीं छाळि गाय दीनवाणी ॥ धृ० ॥
सहजें हनु उचलोनी । मुख तेविं कुरवाळोनि ।
चुंबी रथांगपाणी ॥ १ ॥ बोलेल मंजुल वाणी ।
नच आयकेल कानीं । जरि साश्रु लोचन दोन्हीं ॥ २ ॥

कशी मला विसर पडली? कुणाला तरी सोबतीला घेतल्याशिवाय आलें हाच अगोदर माझा वेडेपणा. बाबा ह्मणाले जा आणि मी तरी कांहीं मागें पुढें विचार करावयाचा—पण नाहीं—आपली निघालें काळोखांतून या काळ्या कुट्ट ढगांतून मधून मधून थोडासा चंद्रप्रकाश पडत आहे ह्मणून कांहीं तरी मार्ग दिसत आहे. पण असें किती वेळ राहणार? आतां येथें आसपास कुणीतरी सोबत मिळाली तर पहावें.

**कृष्ण**—( प्रवेश करून ) हा मी आहें ना ललिते. सर्वांच्या अडचणी टाळावयाचा आणि गरजा भागवावयाचा मक्ता मी होऊन माझ्या अंगावर घेतला आहे. मग तूं कां भितेस ?

**ललिता**—आलास मेल्या काळ्या ! तुला चुकवावें ह्मणून तर काय करावें या विचारांत होतें. आणि तूं आपला दत्त ह्मणून उभा. जसें कांहीं स्वप्नच पडतें !

**कृष्ण**—हाच तुह्मां पोरींचा कृतघ्नपणा ह्मणतों तो ! तुमच्यावर उपकार करावयाला ह्मणून जावें, तर तुह्मीं उलट मलाच दूर लोटतां ! मी तुमची काळजी वाहावी आणि त्याचा मोबदला काय ? शिव्या ! वाः खाशी ललिते !

**ललिता**—कृष्णा, तुझी ही छळावयाची पद्धत कांहीं निराळीच आहे. कुणी ह्मणेल केवढी याला जगाची काळजी ! पण पहावें, तर नंदराजाच्या या रामराज्यांत तूंच एक काय तो काळतोंड्या निपजला आहेस. त्यांनीं तिकडे प्रजेच्या सुखाची काळजी वहावी आणि तूं इकडे दुधावरचें दान, दह्यावरचें दान, पूजेच्या फुलांवर दान अशीं एक ना दोन हजारों दानें उकळावीं.

**कृष्ण**—ललिते, एकाद्या अपराध्याला शिक्षा करावयाची असली तर बाबांना मी एक नवीन युक्ति सुचविणार आहें.

**ललिता**—हं, हं, आणखी कसला गळेकापूपणा आठवला आहे तुला ?

**कृष्ण**—कांहीं विशेष नाहीं. एकाद्याला तोफेच्या तोंडीं द्यावयाचा असला तर तुला उभी करावी आणि तुझ्या तोंडाजवळ त्याला उभा करावा, ह्मणजे एका क्षणांत त्याच्या पार चिंधड्या उडून जातील, आणि ह्मणून असलें हें तोंड बंद कसें करावें याला मी एक उपाय शोधून काढला आहे. तूं तर मला गळेकापू ठरविलें आहेसच तर आतां या हातानें असा ( गळ्यांत हात टाकतो ) तुझा गळा कापून हें तोंड—( चुंबन घेऊं लागतो ) असें बंद करून टाकतों

**ललिता**—चल, काय बरें हें कृष्णा तूं जर असा उगीच त्रास देशील

तर आह्मीं कंसमहाराजांकडे फिर्याद नेऊं. त्यांनीं तुला कांहीं तरी भयंकर शिक्षा केल्या खेरीज तुझे डोळे उघडावयाचे नाहींत.

कृष्ण--अबबब! काय हा फणकारा! पायां पडतों ललिते, तेवढें मात्र करूं नकोस हो! काय पण घाबरलों मी—

( वृक गृहीं जणुं हरिणि सांपडे )

मम तनुप्रति कंप हा सुटे । आश्रयातें तूझ्या
तनुच्या कां झटे ॥ धृ० ॥ पुष्पित हास्य विभूषित
वल्लरी । पल्लवसम करिं सांवरि सत्वरि ॥ उत्फुल्ल
मधुर गल्लमाधुरी । चाखिन बाले गे नटें ॥ १ ॥

ललिता--कृष्णा, मला तुझीं ढोंगें सोंगें सारीं कळतात बरें! मला तुझी सोबत नको आणि कांहीं नको. मी आपली अशी एकटीच जाईन.

कृष्ण--पण मी जाऊं देईन तेव्हां ना? छे, छे, तुला अशी एकटी जाऊं दिल्यास माझ्या ब्रीदाला बट्टा लागेल.

ललिता--कसलं रे तुझें ब्रीद?

कृष्ण--वाः, तुला नाहीं का ठाऊक? कुणाच्याही निंदेची किंवा स्तुतीची पर्वा न करितां यथान्याय जगाचें पालन करणें हेंच माझें ब्रीद.

ललिता--हं हं! सारं जग जसें कांहीं तुझ्यावांचून खोळंबून राहिलें आहे.

कृष्ण--यांत काय संशय? पहा जगांतील सर्व सुखें मी उत्पन्न केलीं. त्यांबेराबरच सुखाची गोडी ओळखण्याकरितां तुह्मीं लोकांनींच दुःखाच्या कल्पना उत्पन्न केल्या. मी तुला सुख होण्याकरितां आलों आणि तूंच उलट मला दूर लोटतेस!

ललिता--जा, जा, कळलीं तुझीं ब्रह्मज्ञानें. एवढासा होतास तेव्हांपासून पाहतें आहें. केवढीही शुल्लक गोष्ट असो. त्यावर तुझें आपलें ब्रह्मज्ञान सुरू असावयाचेंच. कुणी ह्मणेल जसा कांहीं पंडीतच!

कृष्ण--अग, पंडितांचे वाद पोकळ. नुसतें शब्दावडंबर—

**ललिता**—आणि तुझें ?

**कृष्ण**—माझें ? माझा अनुभव–माझी कृति–मीच तुह्मांला समजावून सांगतों. आतां लवकरच मी हा पडदा दूर सारणार आहें, तेव्हांच तुह्मां लोकांचे डोळे उघडतील.

**ललिता**—आमचे डोळे आपले असेच झांकलले असू देत. ह्या तुझ्या गुणांचे या पेक्षां अधिक मोठें स्वरूप आह्मांला दिसायला नको आहे.

**कृष्ण**—हाच तुमचा आंधळेपणा तो ! मी तुमचे डोळे उघडावे ह्मणून प्रयत्न करितों आणि तुह्मी मुद्दाम डोळ्यांवर केंस ओढतां ! तुमचें दुर्दैव–आणखी काय ?

**ललिता**—पुरे कर वटवट. मला जाऊ दे कशी.

**कृष्ण**—छे. आज चांगला प्रकाश पाडल्याशिवाय तुला जाऊं देणारच नाहीं मुळी.

**ललिता**—हें पहा कृष्णा, उगीच नसता त्रास देशील तर तुझ्या पायां-पाशीं डोकें आपटून प्राण देईन.

**कृष्ण**—वाः मग आयताच मोक्ष मिळेल.

**ललिता**—हो, कपाळमोक्ष ना ?

**कृष्ण**—आधीं हा कपोलमोक्ष केल्याशिवाय तुला कपाळमोक्ष करूं देतो कोण ?

**ललिता**—कृष्णा, दूर हो आधीं. खबरदार पुढें येशील तर. गरीबशी मुलगी रानांत एकटी दिसतांच तिला अडवून धरणें तुला परपुरषाला शोभतें का ?

**कृष्ण**—होय मी परपुरुप–मीच–परम पुरुष–मग तुझें काय ह्मणणें ? मी काय तुला खात का आहें ? ललिते, तुला वाटलें तरी काय ? असली कसली अभद्र कल्पना तुझ्या मनांत आली ?

**ललिता**—आतांपर्यंत काय चालविलें आहेस तें तुझें तुलाच नाहीं का समजत ?

**कृष्ण**—मला काय समजावयाचें त्यांत ? माझें प्रत्येक कृत्य पूर्ण विचारानेंच होत असतें. तुमचीं मनेंच अशुद्ध, त्यामुळें माझे शुद्ध विचारही तुह्मांला अशुद्धच दिसतात. तुह्मीं मला परका मानतां. पण—

( चतुर सुगर बैंया )

**सकल जगत मातें मजठायीं दिसतें, तया**
**सूत्रधार मीच एक करिं विहार आधार ॥ धृ० ॥**
**मीच एक तनु अनेक जग मम बिंब असे । प्रतिबिंबितसे,**
**सकल चलन करित मीच । जगता परता असुनी । मज-**
**वीण इतर मुळीं न असे तें ॥ १ ॥**

**ललिता**—असें आडवें तिडवें किती जरी बोललास तरी मी फसावयाची नाहीं हो. माझी वाट सोड अगोदर. नाहींतर पहा मी मोठ्यानें ओरडेन.

**कृष्ण**—ओरड, ओरड पाहूं कशी ओरडतेस ती. (राधा प्रवेश करते)

**राधा**—कुणीतरी बोलले खरें इथें. शब्द ओळखीचासा वाटला. कोण ? ललिते ?-

**ललिता**—कोण राधे ? बरं झालें बाई तूं आलीस ती. पाहिलेंस का या कृष्णानें काय चालविलें आहे तें ? पण तूं इकडे कुठें आलीस या वेळीं ?

**राधा**—अग वेडे, हें आमचेंच विलासवन नव्हे काय ? मी अशी सहज बाहेर उभी होतें. इतक्यांत कुणी तरी येथें बोलल्याचा मला भास झाला ह्मणून पुढें आलें, तर ही तूं—(कृष्णाला पाहून) आणि—कृष्णा—श्रीकृष्णा—आज या दीनेची कींव आली ह्मणावयाची.

**ललिता**—अगबाई ! हें काय ? ही राधा अशी काय बरळत आहे ही !

**कृष्ण**—राधे, या लतेला ( राधेकडे बोट करून ) हे पुष्प ( ललितेस उद्देशून ) कसें शोभतें तें पहावें ह्मणून मुद्दाम आलों होतों.

**राधा**—खरच हा ललिता माझ्यासारखीच तुझें शुद्धप्रेम केव्हां ओळखूं लागेल हेंच मी तुला विचारणार होतें.

**ललिता**—नको ग बाई ! राधे ! तें तुझें प्रेम तुलाच लखलाभ होवो. या तुझ्या प्रेमाचें काय परिणाम व्हावयाचे आहेत ते सारें उघड उघड दिसतें आहे. नको, नको ग बाई !

**राधा**—काय व्हावयाचे परिणाम ?

**ललिता**—सांगूच का आतां लोक काय ह्मणत आहेत तें ? ऐक तर—

( ये पतलि कमर )

**ही तरल हृदया । त्यजील पती रामा । या प्रेमा । विरामा**
**कशी देई वामा ॥ धृ० ॥ कृष्ण वरानी । राहिल मानी ।**
**दाउनि लोकां प्रेमा रामा ॥ १ ॥**

**राधा**—काय हें ललिते, अशी कशी आंधळी झालिस तू ? काय ह्मणत आहेस याचा विचार तरी केला आहेस काय ?

**कृष्ण**—जा राधे, तू आपल्या घरीं जा कशी. पहा, तुला कोणी तरी या वेळीं येथें पाहिलें तर काय ह्मणतील ?

**राधा**—मला कांहीं कुणाला ह्मणावयाचें असेल त्यांनीं खुशाल ह्मणावें! पण मी—

( धिमा धिमा चालो )

**तव पायीं सदाहि प्राण वाहिला । जरि नाहीं कधींही**
**स्मरलें कुला । न विसरें तुला । तुझ्या हेतुला ॥ धृ० ॥**
**वडिल जनीं जरी देह हा दिधलासे अन्यास । भोगो**
**त्यातें तो दुजा । सुख दुखः न मज त्रास । युवतिशी**
**समजोनि परी मला । जरि तयें निज हस्त मला दिला ।**
**नरनारी असा भेद नसे मला । आज राहिला ॥ १ ॥**

**कृष्ण**—काय ललिते, ऐकलेंसना ? तुझी राधा काय ह्मणत आहे ती ?

**ललिता**—अगबाई ! पण ही राधा असें काय करूं लागली ? कृष्णा, इकडे पहा अगोदर.

**राधा**—श्रीकृष्णा, श्रीकृष्णा, (कृष्णाकडे पहात मूर्च्छित होते. कृष्ण एका बाजूनें व ललिता एका बाजूनें तिला सांवरतात.)

**ललिता**—राधे, राधे, सावध हो. सावध हो. डोळे उघडून पहा. कृष्णा, असें काय बरें झालें हिला हें ?

**कृष्णा**—अग, हा कृष्णप्रेमाचा पूर्वरंग आहे. (राधेला सांवरून वारा घालतो)

**रमण**—(प्रवेश करून) हर ! हर ! हें विलासवन या नक्षत्रविरहित नभोमंडलासारखेंच या वेळीं शून्य भासत आहे. याला शोभविणारी ती माझी तारका—माझी राधा ! हाय ! हाय ! प्रेम आणि प्रियतमा या दोहोंनाहीं मी मुकलोंच काय ?

(प्यारी देख कुसुम ऋतु)

**धरी प्रेमीं विरति विकला सुदती । किति ही करि मला**
**विफला जगति ॥ धृ० ॥ पाउनि भंग कुसंगिं मन तें**
**अविचल तपे विरहानें । प्रेम सरींचें अविरल कण ते ।**
**दाविति या लहरी कुमति ॥ १ ॥ होई कुरंग कुरंग-**
**दृशाही मृगजालिं रमे सुख भावी ॥ भासिं पिपासा**
**शमन न होई हें जाणुनि नुमजे सुगति ॥ २ ॥**

माझ्या प्रियतमेनें आणि मी या शिलातलावर बसून या स्तब्ध रात्रीच्या वेळीं प्रणयीं जनांच्या मूकभाषणांत कालक्रमण करावें ही माझी केवढी इच्छा. पण ती सारी व्यर्थ व्हावी ना ? ज्या शिलातलावर आह्मीं उभयतांनीं या वेळीं बसून असावयाचें तेंच शिलातल आज कसें शून्य—(पाहून आश्चर्यानें) अं ! हें काय ! जारकर्माचा हा अद्भुत देखावा ! हा तो नंद कुलांगार कृष्ण—ही त्याच्या हृदयावर मान टाकून पडलेली माझी—छेः—आतां कसली माझी राधा ! पण ही दुसरी कोण ? अरे ! ही तर ललिता !

ही कोमल बालिका ! ही सुद्धां अशीच दुराचरणी ना ! हें जगच फिरलें काय ? छेः छेः पहावत सुद्धां नाहीं. ( जातो. )

**राधा**–( सावध होऊन ) कुठें आहे मी ? काय ? माझा कृष्ण गेला ?

**कृष्ण**–नाहीं, राधे, हा मी येथेंच आहें.

**राधा**–कृष्णा, मी काय चमत्कार पाहिला ह्मणून सांगूं ?

**ललिता**–काय पाहिलेंस ?

**राधा**–काय सांगू तुला ललिते—

( कसें दैव खेळते )

**उठे ऊर्मि अंतरी । विशदा भारी ॥ धृ० ॥ कृष्णमय मी**
**मजसिं दिसले । मीच कृष्ण असें कळे । मी न राधा**
**मी न वसुधा विकारी ॥ १ ॥**

**ललिता**–असें कसें बरें झालें हें ? काय राधे, याचें कारण काय ?

**राधा**–ललिते, तूं अगदीं अजाण आहेस. कृष्णप्रेमाची गोडी तुला अझून कळली नाहीं. केवढी अभागी तूं ! कृष्ण जवळ असून तूं त्याजपासून किती दूर होऊं पहात आहेस !

**ललिता**–दूर ! मी तर ही जवळच आहें.

**राधा**–ललिते, सर्व जगाच्या उद्धारासाठीं अवतरलेल्या श्रीकृष्णाला तूं मनुष्य समजतेस काय ? ललिते, अग्नीच्या अगदीं लहानशा ठिणगीनें ज्या प्रमाणें गवताच्या प्रचंड राशि जळून भस्म होतात, त्याप्रमाणें ज्याच्या नुसत्या दृष्टिनिक्षेपानें प्रबल विषयवासना भस्मीभूत होते अशा या माझ्या श्रीकृष्णावर तुह्मीं विषयलोलुपतेचा आरोप आणतां काय ? ललिते, तुला जर आपल्या जन्माचें सार्थक करावयाचें असेल तर आधीं त्याचे पाय धर त्याला शरण जा.

**ललिता**—(नम्र होऊन) आतां सारं कळलें. राधे, मोहवश झाल्या-




राधाः-(पद) हे वल्लभा ऋषिकेशा। [४

मुळें त्याची सर्व कृत्ति मला शृंगारिक दिसत होती, पण आतां माझी दृष्टी उघळली. मी जागी झालें. राधे, आतां माझ्याकरितां तूंच याची प्रार्थना कर.

**राधा**–( कृष्णाला हात जोडून ) भगवंता—

( श्रीकृष्ण तो परमात्मा )

**हे वल्लभा हृषिकेशा। करीं धन्य दीन योषा॥ हृदयांतरीं जीवेशा। प्रकटे हरीं या पाशा॥ धृ० ॥ न कळोनि जीवितनाथा। तुज निंदि ही जरि आतां। विसरोनि करिं अघनाशा॥ १॥ या भिन्न दों हृदयातें॥ दे एकरूपतेतें। सदया जगन्निवासा॥ २॥**

( पडदा पडतो )

**रमण**–( प्रवेश करून ) कोणत्याही वस्तूची प्राप्ति सुलभ झाली ह्मणजे तिची अवहेलना करून दुर्लभ वस्तूकडे धांव घेणें हा मनुष्यस्वभावच आहे. तशीच माझ्या या पत्नीची स्थिति झाली आहे. संसारांतील सर्व सुखांना सारभूत एक सहधर्मचारिणी–तीच जर अनुकुल नाहीं तर ही कठीण संसारयात्रा पार पडावी कशी? अशा या जीवितापेक्षां अरण्यवास पत्करला; पण तिच्याच तोंडून या तिच्या अपराधाची कबुली करून घेतल्याशिवाय अविचारानें कांहींतरी करणें चांगलें नाहीं. आजपर्यंत लोकांच्या कुजबुजीला फारसें महत्व दिलें नाहीं. मग आतांच घाई करण्यापेक्षां आधीं तिचीच थोडीशी कानउघाडणी करून पहावी. ( जातो ).

## प्रवेश तिसरा.

( राधा आसनस्थ )

**राधा**–या कृष्णानें दहीं दुधाची चोरी करितां करितां शेवटीं मलाच चोरून नेलें—

(मोहे निके लागे राम)

**मन माझें चोरी श्याम । वेणु रवानें रानीं ॥ धृ० ॥**
**धरणी भासे कृष्णमया ही केंवि कळे निजभाव ॥**
**मंदा हृदया चाळवितो कां कुंजीं मंजुल गानीं ॥ १ ॥**

पण करावयाचें काय ? इतरांना कितीही सांगितलें तरी त्यांची खात्री पटावी कशी ! या शृंगारलोलुप गोपगोपींना माझ्या प्रणयाचें खरें स्वरूप कळावें कसें ? तिकडे देखील अलीकडे कांहींतरी संशय आल्यासारखें वाटतें. तिकडचें हृदय किती उदार आणि प्रेमळ आहे ! पण हे कुटाळ लोक नसत्या कल्पना मनांत भरवून देतात. पण तिकडचा तरी काय अपराध ? शृंगारिक प्रेमाचा मोबदला माझ्याकडून मिळत नसल्यामुळें हताश होणें शक्य आहे. पण, मी तरी काय करूं ? प्रेमाचा सर्व सांठा जिकडचा तिकडे गेला. आतां माझ्याकडे प्रेमच मुळीं राहिलें नाहीं. संसारिक गृहसौख्याचा मला आतां वीटच आला आहे. परंतु या वयांत साहजिक असणारी शृंगाराकडची माझी प्रवृत्ति त्यानें कशी उज्वल करून सोडली आहे पहा—

(या जगताच्या ठायीं)

**या भवजाळीं ठेवी । विलास विभवा दावी ॥ धृ० ॥**
**अहंता पाणीं पल्लवितां । समिरें चुंबितो ममता ॥ अखिल**
**कोशीं करी समता । याचि आलिंगना देतां । वेड असें**
**हें लावी ॥ खचिताचि ॥१॥**

**रमण**—(प्रवेश करून) गेलीं—तीं दोघेंही गेलीं. आपल्या जारकर्मनैपुण्याचा प्रत्यक्ष पुरावा मला दाखवून ही माझी सहधर्मिणी ह्मणविणारी स्त्री—ही देखील परत आपल्या महालांत येऊन बसली. हर हर ! ती ललिता एवढीशी पोर—तिच्या मस्तकावर हिनेंच आपला वरदहस्त ठेविला काय ! तिनें देखील निर्लज्जपणानें त्या काळतोंड्याच्या हातांत हात घालून जावें ! तिला कांहींसुद्धां शरम वाटूं नये !

**राधा**—(स्वगत) अरे देवा ! मघांचा प्रसंग पाहिला वाटतें ! आतां

आपणच पुढें होऊन हा गैरसमज दूर केला पाहिजे. (पुढें होऊन) शरम कां वाटावी ? शुद्ध मनाला जननिंदेची काय पर्वा ?

**रमण**—जा, जा, तूं पुढें देखील येऊं नकोस. तुझ्या मुखावलोकनानें माझें तुझ्यावर असलेलें अखंड प्रेम मात्र चळूं लागेल. जा, तूं आहेस तशीच सुखी रहा. पतित्वाची झाली एवढी विटंबना पुरे झाली.

**राधा**—पण, मी ह्मणतें नुसत्या संशयावरून माणसानें एकदम अविचारानें भलताच समज करून घेणें चांगलें काय ?

**रमण**—नुसता संशय ! होय आजपर्यंत नुसता संशयच होता. पण आज पुरी खात्री झाली. शिव ! शिव ! राधे, मी आतांच जो प्रकार पाहिला त्यापेक्षां अधिक तें काय पहावयाचें राहिलें आहे ? आजपर्यंत माझ्या कांनीं येत असलेल्या गोष्टी ह्मणजे अप्रबुद्ध लोकांच्या वल्गना समजत होतों. आणि त्यांनां फारसें महत्व न देतां वराईला सदोदित तुझ्या सहवासाला ठेवून त्या विपर्यांची खात्री करून घेण्याचा प्रयत्न करूं पहात होतों. पण आतांच्या या प्रसंगानें-हरहर ! राधे, काय त्या कृष्णाला अशी भाळलीस—

( वधिन स्वामिं )

वसत काय तव मनीं । स्वयें बोल भामिनि ।। नय विवेक
सोडुनी । पती त्याजीसि मानिनी ।। प्रणय शुद्ध अवमानिसी ।
दग्ध न करिं व्यर्थ पतिसि । प्रेम हाणुनि । तसें
अनृत सांगुनि ।। १ ।।

**राधा**—कृष्णाचें आणि माझें काय नातें आहे हें कळून घेतल्याशिवाय.

**रमण**—त्याचा तुझ्या तोंडानें उल्लेख झालेला मी ऐकावा अशी तुझी इच्छा आहे काय ?

**राधा**—केवळ शिष्यासारखें नातें—

**रमण**—शृंगारविलासांतील कोणते धडे त्याजपासून शिकलीस तें मला ऐकावयाला नको आहे.

**राधा**—शृंगारिक प्रेम हेंच या जगांतलें इतिकर्तव्य असेंच का इकडे वाटतें !

**रमण**—राधे, एका प्रेमपूर्ण हृदयाच्या आसऱ्या खेरीज मला या जगांत काय कमी आहे ? विपुल संपत्ति आहे; राजदरबारीं मान आहे; विद्वत्तेंतही मला कोंणी कमी समजत नाहीं; मग गृहसौख्याचा पूर्ण आस्वाद घेण्या-पलिकडे मी कशाची अपेक्षा करावी ? राधे, तुझ्या मस्तकांत असें वेड तरी काय आहे तें मला सांग. तुझ्या पतितपणाची मजल तुझ्या मना-पलिकडे गेली नाहीं ऐवढें तरी मला कळूं दे. तुझें सर्व कोड मी पुरविन-मग तें कांहींही असो मात्र तें नीतिमार्गाच्या विरुद्ध नसावें.

**राधा**—काय हा संशय ! पण मी सांगते एवढेंतरी ऐकून ठेवावें—

( भय शांतवा )

**नच ह्या मना । अवलोकितां । करा बाह्य भासें न हे**
**तर्क नाना ॥ धृ० ॥ विलासीं मनाची गती ही कळेना ।**
**विभिन्ना विकारीं तरी ती असेना ॥ १ ॥**

**रमण**—पण राधे, वस्तुस्थिति पाहतां तुझ्या या शब्दांवर कां विश्वास ठेवावा हें मला कळत नाहीं.

**राधा**—विश्वासाच्या जागीं अविश्वास दाखविणें हें प्रेमाचेंच का लक्षण !

**रमण**—पण तुझें हें असलें वेड तरी कसलें आहे !

**राधा**—माझेंही वेड इकडच्या सारखेंच आहे, मीही प्रेमासाठींच उदासनि होतें.

**रमण**—पहा,आतां तूंच आपल्या मुखानें आपला भयंकर अत्याचार कबूल करीत आहेस.

**राधा**—पण माझें प्रेम कुणावर आहे तें कळलें काय !

**रमण**—अर्थात् कृष्णावर.

**राधा**—असेंच काहीं नव्हे.

**रमण**–तर मग असा कोणता भाग्यवान् प्राणि तुझ्या प्रेमाचा विषय होऊन राहिला आहे ?

**राधा**–तो भाग्यवान् प्राणी हाच. माझें प्रेम माझ्यावर-स्वतःवरच बसलें आहे. आणि इकडचें प्रेम तरी कुणावर आहे ?

**रमण**–हें तूं विचारावें काय ? राधे, एक तुझ्याशिवाय माझें प्रेम दुसऱ्या कुठें असणार ?

**राधा**–निव्वळ खोटें ! सारा भ्रम ! इकडचें प्रेमहि माझ्या सारखेंच स्वतःवर आहे.

**रमण**–छेः छेः माझ्या प्रणापेक्षांही तूं मला प्रिय आहेस.

**राधा**–मी प्रिय आहें ह्मणजे कोण ? ही हाडामांसाची पुतळी ?–

( आई कां मजसवें )

**देहीं कां मन रमे अशिव या । एका समया जाइल निर-**
**या ॥ धृ० ॥ अवयव मांसल रेखुनि खचिले । जरठपणीं**
**हे होतिल वांया ॥ १ ॥ प्रमाणशिर या अस्थी चर्मी ॥**
**बसवुनि दिधल्या सुखदा कां या ॥ २ ॥**

कां ? आतां कां स्तब्ध राहिलां ?

**रमण**—तूं जर असें अभद्र बोलूं लागलीस तर स्तब्ध राहूं नको तर काय करूं ? राधे, माझें प्रेम केवळ तुझ्यावर–तुझ्या सौंदर्यावर नव्हे. कारण—

( राष्ट्रोन्नति )

**ही प्रेम विमलतम माधुरी । सदा शुद्धतम राहते । लय**
**होइ न जरि जरठ विकल ॥ धृ० ॥**
**उगम पावते तरुणांच्या हृदयीं । परिणत समयीं विकास**
**तियेस । मूक होइ वय निदाघकालीं । असे सदा चिर-**
**स्थली चिरस्थली ॥ १ ॥**

**राधा**—तर मग हा देह पडल्यावर तुमचें प्रेम कुठें जाईल ?

**रमण**—दुर्दैवानें तसें झालेंच तर संन्यास घेऊन तुझ्या नांवाचा जप करीत राहीन. पण राधे, तुला पुन्हा सांगतों या जगांत माझें जीवितसर्वस्व तूंच आहेस.

**राधा**—नाहीं. मुळींच नाहीं. हें सारें प्रेम ज्याचें त्याच्यावरच असतें. एका जीवानें दुसऱ्या जीवावर जीवभावानें प्रेम करणें मुळीं शक्यच नाहीं. खरोखर—

( साधो राम भजन कर लेना )

**हें प्रेम नव्हे स्त्रीसाठीं। आवडि आपुली ही मोठी ॥धृ० ॥ कामिं मनें जों उभयांचीं तों प्रेम असे पोटीं। काम जळे मग प्रेम पळे तें पडे कपाळा आठी ॥१॥ प्रजा करितसे प्रेम नृपति जों ठेवि न्यायदृष्टी। न्याय सुटे अन्याय थटे मग तुटे उभय भेटी ॥ २ ॥ स्वार्थ असे परमार्थ नसे ही प्रेमळता खोटी। रमे चित्त चिज्ज्योति ठायीं हें परि गति उफराटी ॥ ३ ॥**

**रमण**—राधे, आतां किती कंठशोष करून तुला सांगू ?—

( ऊन आई बदरियां )

**वाहिं तूतें हृदय हें सदा इतर ठायीं जाइ नच कधिंहि ॥ धृ० ॥ प्रणयपर सतत मी। स्मरण तव करितसें। मज इतर विषयिं नच। हो सुख हृदयिं ॥ १ ॥**

**राधा**—आपलें प्रेम माझ्यावर आहे ह्मणजे काय समजावयाचें ? समजा, मी परस्त्री आहें तरीही आपलें हें प्रेम असेंच कायम राहील काय ?

**रमण**—राहील खरें. पण धर्मनीतीच्या दृष्टीनें विचार केल्यास तो व्यभिचार होईल.

**राधा**—ह्मणूनच ह्मणतें हें मुळीं प्रेमच नव्हे. हेंच जर शुद्ध प्रेम असतें तर व्यभिचाराची कल्पना मनाला शिवलीसुद्धां नसती. ह्मणून ह्मणतें आपलें हें प्रेम केवळ विपरीत आहे.

**रमण**—हें तुझें विधानच मुळीं विपरीत आहे. नीतिमार्गाचें उल्लंघन होत असल्यास मनुष्यानें प्रबल मनोविकार कितीही शुद्ध असले तरी

त्यांना आळा घातला पाहिजे. स्वस्त्री ती स्वस्त्री आणि परस्त्री ती परस्त्री. परस्त्री तर मातेसारखी.

**राधा**—परस्त्रीवर मातृभावानें तरी प्रेम असूं शकेल कीं नाहीं?

**रमण**—अर्थात असुं शकेल. ज्या वेळीं प्रेमाचा ओघ तसा फिरेल त्यावेळीं मातृत्वाची कल्पना प्रबल होऊन क्षुद्र मनोविकारांना खालीं दडपील आणि तीच शुद्ध कल्पना कायम ठेवील.

**राधा**—काय प्रेमाची दुर्दशा ही! हे प्रेमाचे तुकडे पाडले आहेत ह्मणावयाचे एक प्रेमाचा सांठा घेऊन मग त्याची निरनिराळ्या ठिकाणीं कमी अधिक प्रमाणानें वाटणी करून दिली आणि मग मातृप्रेम, पितृप्रेम, पत्नीप्रेम अशी निरनिराळीं प्रेमें ठरवून त्यांच्या ठिकाणीं निरनिराळ्या मनोविकारांची योजना केली, असेंच ना? केवळ शुद्ध प्रेम असणें शक्यच नाहीं का?

**रमण**—असेल. पण मला एवढें एक पूर्णपणें ठाऊक आहे कीं या सर्व प्रेमावलींत पतिपत्नी प्रेम हेंच एक शुद्ध आणि श्रेष्ठ आहे.

**राधा**—श्रेष्ठ कां? पत्नी ह्मणजे स्वस्त्री! स्वतःची मत्ता! ह्मणूनच तिची काळजी वाहायाची; ह्मणूनच तिची मनोधारणा करावयाची; असेंच कीं नाहीं?

**रमण**—राधे, असल्या या तेढ्या बोलण्याचा मला फार तिटकारा आहे. मी एकमार्गी मनुष्य आहें—

**राधा**—आणि ह्मणूनच मी ह्मणतें—

(अति दीन प्रिया)

**सुखसार जरी प्रेमा। अभिलाष कसा कामा। तरि काय तया नेमा। मिषभाव असे सीमा॥ ध०॥ निज तात सुता माता। सुहृदीं धरी ममता। पति काय त्यजीं कांता। विसरोनि निज धर्मा॥ १॥ तनुभाव धरी आत्मा। विषयांत जडे प्रेमा। तरि एक सुखारामा। विसरूं नये धार्मा॥ २॥**

**रमण**—आपल्या नीचतम प्रेमाच्या समर्थनासाठीं केलीस तेवढी वल्गना पुरे नाहीं का झाली ?

**राधा**—( न ऐकलेसें करून ) शुद्ध प्रेमाला मत्सराचा संपर्क देखील होत नाहीं. तेव्हां प्रेम असें मत्सररहित व्हावयाला एकच उपाय—

**रमण**—नको. तुझा तो उपाय मला ऐकावयाला नको आहे. परस्परांच्या मनाला त्रासदायक होणारा हा संवाद आतां पुरे झाला. आतां—

**राधा**—नाहीं. निदान मला तरी यांत त्रासदायक असें कांहींसुद्धां वाटत नाहीं.

**रमण**—तुला कां वाटेल ? तुला आपलें दुर्वर्तन छपविण्यासाठीं प्रमाणें दाखवावयाचीं आहेत पण मला तीं खोडून काढावयाचीं आहेत. असल्या नाजुक विषयांत वितंडवाद घालित बसणें मला असह्य होत चाललें आहे. जा–राधे–तुला पुन्हां सांगतों, तूं आहेस अशीच सुखी रहा. माझ्यासाठीं तुझ्या हृदयांत प्रेमाला थोडीतरी जागा मिळत असेल तर पहा.

**राधा**—सर्व जगताचें मूळच जर माझ्या प्रेमाचा विषय आहे तर आपण काय त्याबाहेर आहां ?—

**रमण**—पुरे कर आतां–माझें एवढें एक शेवटचें सांगणें ध्यानांत ठेव–

( पापी दादुरवा )

**सदा प्रणया विकासिनी । सुखदा रमणी । हृदयिं धरीली ॥**
**हृदय जहाली । सकल कालीं ॥ धृ० ॥ गहन तिमिरिं**
**चपला चंचला । होय पथिक जन विरामा । सोडीं**
**भ्रमा । विकल हृदय पतिला भवतमीं हो दामिनी ॥ १ ॥**

( जातो ).

**राधा**—एकच शब्द ऐकावयाचा एवढा– छे: नाहींच ऐकत. जावयाचेंच शेवटीं. परमेश्वरा, तूं प्रणयरूप आहेस. माझी दीनेची ही एकच विनंती ऐक—



रमणः-राधे हें तूं विचारावेंस काय ! [४५]

M P W

( चतुर व्रज नारीरे )

व्यसन विभुरे वारी । अहिसम विषखनि भामिनि प्रियकर
मानी तुजसि विषम आकारी ॥ धृ० ॥ जीव सकल नग
असोनि तूं कांचन त्यातें ॥ असे भ्रांत मम कांत तयातें
प्रत्यय दावीं सदय हृदय तारी ॥ १ ॥ प्रेम परम परमधाम
पदकमलीं राहो । महापूर प्रणया मग येवो । निरसो
द्वैता विमल सलिल भारी ॥ २ ॥

( जाते. )

## प्रवेश चौथा.

( ललिता व तिचा बाप प्रवेश करितात )

ल० बाप--खबरदार एक पाऊल पुढें टाकशील तर! दुष्टे, कुलकलंके, मला जगांत तोंड दाखवावयाला आतां जागा राहिली नाहीं. तुझ्या ह्या वर्तनानें सगळ्या गोकुळांत माझें नांव बद्दू झालें आहे. तुह्मीं स्वच्छंद पोरांनीं हवें तसें स्वैर वर्तन ठेवावें आणि त्याजबद्दल बट्टा मात्र आह्मांला! काय, तर ह्मणे बापाचें या मुलांना शिक्षण नाहीं! हीं असलीं पोरें निपजलीं तर बापानें काय जीव द्यावा? शिकवावयाचें ह्मणून किती! त्याला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं?—खबरदार एक पाऊल पुढें होशील तर—

ललिता—बाबा, वडिलांची मर्यादा वडिलांनींच राखून घेतली पाहिजे. फाजील दाबाचे परिणाम काय होतात याचा अनुभव उगाच कशाला घेतां? मीं कांहीं आतां अगदीं लहान नाहीं. मला माझें हित अनहित चांगलें कळतें! सोडा मला. मी राधेच्या घरीं जाणार. तेथून मला कृष्णाच्या दर्शनाला जावयाचें आहे.

ल० बाप—काय? धडधडीत माझ्यासमोर माझा उपमर्द करतेस? प्रत्यक्ष बापाचा उपमर्द!—आणि तो कुणासाठीं!—तर स्वतःच्या नवऱ्याला तुच्छ करून गुलगुलीत चेहऱ्याला भाळलेल्या त्या बाजारबसवीसाठीं—

**ललिता**—जीभ आटोपून बोला बाबा!—राधेला बाजारबसवी ह्मटलेलें मी प्रत्यक्ष बापाच्या तोंडूनदेखील ऐकून घेणार नाहीं!—

**ल० बाप**—नाहींच तुला ऐकवणार तें! तुला आतां बापाची चाड कसची राहिली आहे! प्रत्यक्ष नवऱ्याला लाथाळणाऱ्या त्या अवदसेनें आतां तुझ्या मस्तकावर वरदहस्त ठेविला आहे, तेव्हां लहानपणापासून ज्यानें तुझें यथायोग्य संगोपन केलें तो तुझा मूर्ख बाप तुला आतां तिरस्करणीय झाला यांत कांहीं आश्चर्य नाहीं!

**ललिता**—राधेच्या वरदहस्तानें माझ्यांत स्थित्यंतर घडवून आणलें आहे खरेंच! आणि त्याचे परिणामहि तुह्मीं ह्मणतां तसेच झाले आहेत. कारण आतां—

( तरुणी न माति गे )

**सुहृदीं न राहिली। ममता मनीं॥ धृ ०॥ होई जनक मायही। एक श्रीहरी महीं। चरणकमलरज तारक ते मज मानीं॥ १॥**

**ल० बाप**—असें काय बाईसाहेब! बरें आहे तर आतां पहातों तुझा तो कृष्ण कसें तुझें रक्षण करितो तो! काय ह्मणे परमेश्वराचा अवतार! परमेश्वराचे अवतार जसें कांहीं गल्लोगल्लीं लोळत पडले आहेत! कुठल्या गांवाला छळावयाची संधि आली कीं, उचलला एक परमेश्वराचा अवतार दिला त्या गांवात फेंकून! परमेश्वराचा अवतार!—आणखी ते आमचे एक दिव्य चिरंजीव! ईश्वरानें वांकडा केला आहे ह्मणून बरें, नाहींतर सर्व जगाला आग लावता! ते ह्या परमेश्वराच्या अवताराचे बगलबच्चे! यांनीं हव्या तशा चोऱ्यामाऱ्या लांड्यालबाड्या कराव्या आणि त्याच्यावर हें परमेश्वराच्या अवताराचें पांघरूण घालावें!—

**ललिता**—बाबा! आतां पुरे कराल कीं नाहीं? जें कांहीं तुह्मांला करावयाचें असेल तें करा, पण भगवंताच्या निंदेनें व्यर्थ आपली शुद्ध जिव्हा विटाळवूं नका.

**ल० बाप**—हो हो तुला यावयाचाच राग! ज्या कारटीला बापाशीं बेमु-

र्वतीनें वागण्यांत काडीचीदेखील शंका वाटत नाहीं तीच त्या काळतोंड्या-च्याविरुद्ध एक शब्द निघतांच कशी पिसाळून जात आहे पहा ! तरी बरें, ते आमचे दिवटे चिरंजीव नाहींत यावेळीं ! नाहीं तर आपल्या स्नेह्याची तरफदारी करतांना बहिणीचा पाठिराखा होण्याची ही अमोल संधि त्यानें खास फुकट दवडली नसती.

**पेंद्या**–( प्रवेश करून ) छेः छेः बाबा, असे निराश होऊं नका. आपल्या चांगल्याच चेतविलेल्या क्रोधाग्नींत तेल ओतावयाला एका पाया-वर तयार असलेला–दुसरा पाय वड आहे कुठें ह्मणा !—हा आपला प्रियतम कारटा अभिवंदन करतो.

**ल० बाप**–आतां माथें फिरणार माझें ! काय हीं पिसाट कारटीं ईश्वरानें माझ्या पोटीं उत्पन्न केलीं !—

**पेंद्या**–काय बाबा ! तुमच्या पोटीं ?

**ल० बाप**–चूप बैस कारट्या. व्यर्थ बडबड करावयाला शरम नाहीं वाटत ?

**पेंद्या**–नाहीं, ह्मटलें आपल्या रागाची कमान कितीशी चढते तें अज-मावून पहावें. पण बाबा, असे रागाऊं नका. हीं आमचीं भांडणें रोज-चींच आहेत. पण सरकारवाड्याच्या दिंडीदरवाजासारखें चौकोनी तोंड करून राहिलेली ही ललिता आज येथें कुठें आपल्या रागाच्या तडाक्यांत सांपडली ?

**ल० बाप**–नांव काढूं नकोस त्या मस्तवाल कारटीचें ! लहान असता-नांच आईचें वाटोळें करून बसली. आतां मला देखील देशोधडीस लावावयाचा विचार दिसतो हिचा. अरे, सगळ्या गोकुळांत तोंड वर करावयाला मला जागा राहिली नाहीं !

**पेंद्या**–( स्वगत ) तोंड वर करतांना कपाळास आपटण्याइतकें गोकु-ळांतलें आकाश ठेंगणें झालें आहे की काय ?

**ल० बाप**–ही आतां एवढी सतरा अठरा वर्षांची घोडी झाली आणि परवा ते आमचे वत्सलराव आले होते हिला मागणी घालवयाला, तर

धडधडीत त्यांच्या तोंडावर मी लग्न करणार नाहीं ह्मणून सांगूं लागली ! ह्मणावें, लग्न करणार नाहीं तर करणार काय ? तिला ह्मणे, तो कृष्ण नवरा हवा आहे. असा चोर, जार, चहाटळ, पाजी, हरामखोर मनुष्य मी—

**पेंद्या**—कोण बाबा ? तुह्मीं !—

**ल० बाप**—कारट्या, तोंड आटोपून बोल. अशी श्रीमुखांत देईन !

**पेंद्या**—छेः बुवा, हें नवीनच आहे कांहीं. बाबा, तोंड आटोपल्यावर कसें बोलावयाचें हो ? आणि मुखांत श्री कशी देणार ? आमचे गुरुजी सारखे सहा वर्षे मेहनत करीत होते कीं आमच्या मुखांत श्री जावी ह्मणून. बाबा तुह्मांला ठाउकच आहे तें. पण आह्मीं केला पोक्त विचार.— ह्मटलें ' श्री ' आली कीं पुढें ' ग ' यावयाचा. तेव्हां बाबा, मेहरबानी करा; तेवढी श्री मात्र मुखांत देऊं नका.

**ल० बाप**—मरेल हीं कारटीं ! ईश्वरा, कशीरे तुला माझी दया नाहीं येत ?

**पेंद्या**—बाबा, ईश्वरी कृपेचा हा पूर्वरंग आहे. अगोदर विरोध, मग शंका, मग मुमुक्षा, नंतर ज्ञान, भक्ती, प्रेम आणि पुढें तादात्म्य. (स्वगत) कृष्णाच्या सहवासामुळें वेदांतांतील चार पारिभाषिक शब्द तर झोंकून द्यावयाला मिळत आहेत. ( उघड ) पण, बाबा, तें राहूं द्या आतां. तं ललितेच्या लग्नाचें काय ह्मणत होता तें ? काय ललिते; कधीं बाई तूं आह्मांला मेव्हणे आणून देणार ?

**ल० बाप**—हो हो. आतां तिच्यावरें येणार तीच पाळी. घरीं चालत आलेला नवरा लोटून दिला. लग्न करावयाचें नाहीं ह्मणते, आतां पेंद्या.. तुला मेव्हणेच !

**ललिता**—भगवता, तुझ्या भक्तांचा हा छळ कसारे पाहवतो तुला ?

**पेंद्या**—बाबा, ही ललिता खरोखर महामूर्ख आहे. तुह्मीं केवढ्या अड-चणीत आहां हें हिला ठाऊक नाहीं अजून. कारण, असें पहा, तुह्मीं

जर हिला नवरा शोधावयाला गेलांत तर त्याला द्यावा लागेल हुंडा. पुढें आणखी देणग्या आणि हें आणि तें. बरें पुढें आपली रक्कम तरी वसूल व्हावयाची कांहीं आशा आहे ह्मणावें तर तीही नाहीं. कारण मी आहें हा असा सात ठिकाणीं वांकडा. अशी कोणाची पोर वर आली आहे मला द्यावयाला ! तेव्हां आतां ह्या चालत आलेल्या नवऱ्याबरोबर लग्न लावून दोघांनाहीं पालखींतून पाठवून द्या ह्मणजे त्या बिचाऱ्याचें चालत आल्याचें कांहींतरी सार्थक होईल !

ल० **बाप**–गाढवा, हरामखोरा, थट्टा करतोस माझी ? नीघ येथून तोंड घेऊन !—

**पेंद्या**–तोंड ठेवून गेलों तर तें तुमच्या उत्तराला प्रत्युत्तर देत राहील येथें.

ल० **बाप**–चल नीघ, पाजी, हरामखोर, गाढव, मूर्ख, अक्कलशून्य, फाजील, नादान कारटा कुठला. ( त्याला मारून घालवितो ) आणखी तूं ये गधडे, तुला कृष्णाचें दर्शन हवें असेल नाहीं ? चल तुला अंधार-कोठडींत कोंडून ठेवितों, ह्मणजे कृष्णासारख्याच काळया कुट्ट अंधाराचें तुला अखंड दर्शन घडेल.

( तिला ओढीत नेतो . )

## प्रवेश पांचवा.

( सुबल प्रवेश करितो )

**सुबल**–काय या गोकुळांतील लोकांची स्थिति ही ! सर्व जगताच्या कल्याणासाठीं जो मनुष्यरूपानें परोपरीचे क्लेश भोगीत आहे, त्यालाच हे आंधळे लोक नांवें ठेवताहेत. जो जशी भावना ठेवितो तसाच तो त्याला दिसतो, हें या मूर्खांनां कसें कळत नाहीं ? ज्या रंगाच्या कांचेतून सूर्य पहावा त्याच रंगाचा तो दिसतो ह्मणून तो त्याच विवक्षित रंगाचा आहे असें ह्मटल्यास कसें शोभेल ? कांहींका ह्मणेनात. यांच्या बडबडीनें कृष्णाची योग्यता थोडीच कमी होणार आहे ? प्रत्येक श्रेष्ठ पुरुषाच्या

कच्छपीं निंदक हे असावयाचेच, तसेच येथेंही आहेत. या निंदकांचा अग्रणी हा रमण समोरूनच येत आहे; स्वारी स्वतःशींच पुटपुटत कोणीकडे बरें चालली आहे ? बाजूला होऊन पहावें तर खरें.

**रमण**–( प्रवेश करितो ) माझ्या हातीं सत्ता असती तर या कृष्णाला नामशेष करून टाकला असता. राजानें न्यायनीतीचें संवर्धन केलें पाहिजे खरें, पण माझ्यासारख्या-त्याच्याच एका शुल्लक प्रजाजनानें आणलेली फिर्याद ऐकून तो स्वतःच्या मुलाला शिक्षा करील ! छेः हें तर अगदींच अशक्य. राजाच्याच मुलाविरुद्ध राजाकडेसच फिर्याद न्यावयाची आणि तीही स्वतःच्या अब्रूला धक्का बसेल अशी, छे ! हा विचारच सोडून द्यावा असें वाटतें. पण ही हृदयाची तळमळ रहावी कशी ?

( मदना चंद्रा )

**हृदया होई गभीर जरा कालिं या ॥ धृ० ॥ कामिनी कामें धृति तव विरमे । मुकाशील सकल जया । अरे हृदया ॥ १ ॥ विपरीत कृति तव देखुनि अभिनव । पावो कुजन भया । अरे हृदया ॥ २ ॥**

आतां याला उपाय तरी काय योजावा ? हर हर ! भगवंता, काय हा तुझ्या घरीं अंधेर !

( देखोरी व माने )

**स्मरतों सतत पाय ॥ सदया तया ऐशि कशि**
**लाविली हाय ॥ धृ० ॥ न कधीं तुला चिंति ॥ दुर्मार्गीं**
**करि वसति ॥ त्या संकटें भीति ॥ हा न्याय तरि काय ? ॥१॥**

नीतिमार्गाप्रमाणें शुद्धाचरणी असणारा मी सदा दुःखी आणि दुर्मार्गाचा केवळ पुतळाच असा तो कृष्ण सुखाच्या शिखरीं डुलत रहातो !

**सुबल**—( स्वगत ) मनुष्याचें मन उद्विग्न झालें म्हणजे तो आपल्या आजूबाजूला न पहातां मनांत ठेवावयाच्या गोष्टी बरळून दाखवूं लागतो. तशीच या रमणाची स्थिति झाली आहे. खरोखर मला याची फार कींव येते. यावेळीं याला कितीही उपदेश केला तरी तो फुकट जाणारच. तरीही पण उपदेश केल्याशिवाय माझ्यानें रहावत नाहीं. तर आतां व्हावेंच पुढें. ( पुढें होऊन ) काय रमणराज, आपलें कुशल आहे ना ?

**रमण**—कोण सुबल ?

**सुबल**—नाहीं ह्मटलें कृष्णाविषयीं आपण काहीं बोलत होतासें वाटलें.

**रमण**—बरें मग ? तुमच्या या कृष्णराज्यांत स्वतःचे विचार स्पष्टपणें बोलण्याचा देखील प्रतिबंध आहे वाटतें ?

**सुबल**—बोलावयाला कुणी कोणाचें तोंड धरलें आहे ह्मणा ! पण कोणाला आणि काय बोलतां याचा कांहीं विचार ?

**रमण**—अविचारानें मी कांहींच करीत नसतों. थोर लोकांची कां होईना पण योग्य कामीं कान उघडणी करावयाला कां भ्यावें तें मला समजत नाहीं. हवा तसा धिंगाणा माजवून कुणाला टीकाही करतां येऊं नये अशी तुमच्या कृष्णानें कांहीं योजना केली आहे वाटतें ?

**सुबल**—धिंगाणा ! कृष्णाचा कसला हो तुह्मीं एवढा धिंगाणा पाहिलात ?

**रमण**—नुसता धिंगाणाच नव्हे, पण याच्या दुष्ट वर्तनामुळें आतां गांवें ओस पडावयाची वेळ आली आहे. व्यभिचाराला तुह्मीं सद्गुणच समजतां वाटतें ?

**सुबल**—काय ? कृष्ण व्यभिचारी ! अहो त्याचें वय काय, आणि तुह्मीं बोलतां हें काय ?

**रमण**—वय कमी असलें ह्मणून काय झालें ? ज्याच्या ठिकाणीं राक्षसी माया संभवते त्याला वाटेल तेव्हां लहान मोठा होणें कठीण नाहीं.

**सुबल**—आतां या तुमच्या भोळेपणाला हंसावें कीं रडावें ? हें पहा, त्याचें वय आहे तेवढेंच जर धरून चाललें तर तुम्हीं म्हणतां असले मनोविकारजन्य अपराध त्याचे हातून होणें शक्यच नाहीं. बरें तो लहान मोठा होत असतो म्हणावें, तर बोला, ज्याच्या अंगीं अशी अमानुष शक्ति आहे, त्याचें तुम्हीं काय करणार ?

**रमण**—आणि ह्मणूनच या असल्या राक्षसी मायेचें निवारण करण्याची युक्ति मी शोधींत आहें.

**सुबल**—अहो ही राक्षसी माया नव्हे. ही महामाया आहे समज

लांत ? कंसराजाधिराजासारखा महाबलाढ्य राजा एवढ्याशा मुलाला भिऊन मोठे मोठे पराक्रमी राक्षस त्याचा नाश करण्याकरितां पाठवितो आणि तोच मुलगा त्या राक्षसांची माया ओळखून निमिषार्धांत त्यांनां कालमुखीं पाठवून देतो. यावरून हाच लहानसा मुलगा सर्व मायेचा नियंता आहे कीं नाहीं तें तुह्मींच सांगा.

**रमण**—मला वाटतें, तुह्मीं त्याला हळू हळू ईश्वरच ह्मणूं लागाल.

**सुबल**—हो हो. मी तेंच ह्मणतों. तो प्रत्यक्ष ईश्वरच आहे मुळीं.

**रमण**—ईश्वर सर्वगुणसंपन्न आहे हें तुह्मी विसरलांत वाटतें ? कृष्णाला जर ईश्वर ह्मणावयाचें तर मग सद्गुण या शब्दाची व्याख्याच पार बदलून टाकावी लागेल. एकच दुर्गुण अनेक सद्गुणानां मातीमोल करून सोडतो हें तुह्मांला माहीत नाहीं वाटतें ?

**सुबल**—हेंच तें ! आह्मां लोकांचें चुकतें तें येथेंच. स्वतःच्या हातून कांहीं सुद्धां होत नाहीं, पण श्रेष्ठ पुरुषांच्या थोर कृतींनां नांव ठेवण्यांत मात्र तत्पर. ज्याच्या हातून गोकुळाच्या संरक्षणांसाठीं एवढीं अलौकिक कृत्यें घडत आहेत त्याची एखादी कृति तुमच्या मताप्रमाणें चुकीची दिसली तर त्याला धडकवून दोषी ठरवणें हा खरोखर अधोगतीचा पाया आहे. ज्याच्या ठिकाणीं गुणांचें आधिक्य आहे त्याच्या सकृत्दर्शनीं दिसणाऱ्या एखाद्या दुर्गुणाबद्दल त्याला दोषी ठरवतांना फार विचार केला पाहिजे. असें मद्यप्यासारखें वरळलें ह्मणजे झालें नाहीं.

**रमण**—मी मद्यप्यासारखें बरळतो ? सुबल, काय बोलतां याचा विचार करा.

**सबल**—हो मद्यप्यासारखेंच. बोला, मद्यप्यांत आणि तुमच्यांत काय अंतर आहे ? मद्यपी मद्य नसलें ह्मणजे कासावीस होतो, तुह्मीं विषया-साठीं तळमळतां; मद्यपी मद्य हातीं येतांच अधाशासारखा प्राशन करूं लागतो, तुह्मीं विषय वासनेत अधाशी होतां; विषयसेवनानें विकारवश होऊन मद्यप्याप्रमाणें तात्कालिक-स्फुरण पावणाऱ्या मनोवृत्तींत तुह्मीं तादात्म्य पावतां; मद्यपी रडूं लागला तर रडतच रहातो, हसूं लागला तर हंसतच रहातो, त्याचप्रमाणें तुह्मींही विषयांतील सुख-दुःखाच्या



क. बाः—कारट्या तोंड आटोपून बोल ! अशी श्रीमुखांत देईन. [५२]

अनुरोधानें हंसूं किंवा रडूं लागतां, मद्यप्याप्रमाणें एकच वृत्ति कायम ठेऊन मग तुह्मीं जग पाहूं लागतां; मद्यप्याला स्थिर असलेली भूमि जशी फिरत आहे असें वाटतें तसेंच तुह्मांलाही जगांतलि सर्व सत्य तें असत्य आणि असत्य तें सत्य वाटतें; कृष्णाचें तसें नाहीं. त्याचें मन स्वतःसिद्ध शुद्ध आहे; ह्मणून त्याचा कोणाशींच विरोध नाहीं. तुमच्या दृष्टीला त्याचें वर्तन शृंगारिक दिसतें याला कारण तुमची विषयलोलूपता.

**रमण**—ह्मणजे! हा सारा आमचाच दोष असें तुमचें ह्मणणें? बरोबरच आहे. दोषी मनुष्य आपला दोष केव्हांही कबूल न करितां आपल्या दोषांचें खापर दुसऱ्याच्याच माथीं फोडतो.

**सुबल**—रमणराज, स्वस्थ मन करून थोडा तरी विचार करा, ह्मणजे आपोआप तुमची चुक तुह्मांला कळून येईल. अवतारी पुरुषाची निंदा करून व्यर्थ पदरांत पाप कां बांधतां?

**रमण**—अवतारी पुरुष—ईश्वरावतार—सुबल, हे शद्ब कृष्णाला लाविल्यानें ईश्वराची किंमत मात्र कमी होत आहे. हा जर ईश्वराचा अवतार आहे तर—

( तुझे माल रानीं )

**छळी केविं दानीं। योषिता रानीं! झाली विषवती असोनी सुवाणी ॥ धृ० ॥ मनिं कपटि जन निकटिं किति दावि दीनता। हा अधम परनारिसंगें रमोनी ॥ १ ॥ परयुवात जे हरिति त्यां दंडि राम जो त्याचाचि अवतार हा काय मानी ॥ २ ॥**

**सुबल**—अहो कांहीं तरी विचार करा. हें विषयदृष्टीचें वेड सोडा. जो सर्व चराचराला व्यापून राहिलेला, सर्व जगाचा पालनकर्ता, सर्व जगाचा जनक, त्याला तुह्मीं अधम, परनारीरत, म्हणतां काय? सर्व जगताच्या पित्याच्याठायीं व्यभिचार संभवेल तरी कसा! काय तुमची दृष्टी ही! अथवा तुम्हांला उपदेश तरी कसला करावयाचा! मला वाटतें तुमच्या उन्नतीचा—तुमच्या उद्धाराचा—काल आला आहे. म्हणूनच तुम्हांला आधीं हा अवनतीचा मार्ग आठवला आहे. चालूं द्या—तुमची ही निंदा,

अशीच चालूं द्या. कारण जसजशी, तुह्मीं कृष्णाची निंदा करीत आहां, तसतसा तो सर्व गोकुळाला अधिकाधिक प्रिय होत आहे. अशानें तुमचे तुह्मींच त्याच्यावरील सर्व आक्षेप पुसून काढाल, आणि शेवटीं माध्यान्हींच्या प्रखर सूर्याप्रमाणें त्याची उज्वल कीर्ति सर्व जगतीतलाला दैदीप्यमान करून सोडील. ( जातो )

**रमण**—हा कृष्ण खरोखरच अवतारी पुरुष आहे काय ? किंवा ह्या याच भाबड्या लोकांच्या पोकळ कल्पना ? गोकुळांत याचा उदय झाल्यापासून गोकुळावर संकटांची पर्वणीच येत आहे. याच्याच नाशाकरितां राक्षस येतात. पण या लोकांनां वाटतें कीं हीं संकटें आपल्यावरच आलीं आहेत. स्वसंरक्षणाकरितां कांहींतरी करून त्यांचा प्रतिकार करणें याला भाग पडतें पण या वेड्या लोकांनां वाटतें कीं यानें केवळ आमच्याच संरक्षणाकरितां एवढाले कष्ट सहन करून हीं अरिष्टें दूर केलीं; आणि मग हे लोक त्याचे देव्हारे माजवतात. एखाद्याला श्रेष्ठपणाच्या शिखराला चढवावयाला या लोकांना अगदीं अल्प कारणदेखील पुरेसें होतें आणि श्रेष्ठपणा मिळविण्यासाठीं हपापलेलीं माणसेंही आटोकाट श्रम करून लोकांच्या डोळ्यांत भरण्याचा प्रयत्न करीत असतात. तें कांहीं का असेना. पण माझें मन मात्र चक्रांत पडल्यासारखें झालें आहे खरें. काय माझी स्थिति ही ! रस्त्यावरून जाणाऱ्या एखाद्या उल्लू पोरानें मला बुद्धिवाद शिकवावा ? सर्पानें जर फूत्कार करावयाचा टाकला तर एखादें तान्हें मूलदेखील त्याजवर खडे मारूं लागतें. येवढ्यासाठींच हा सहनशीलपणा टाकून ही फिर्याद नंद राजाकडे नेल्याशिवाय या चांडाळ पोरांना धाक बसणार नाहीं. त्यामुळें माझें कितीही नुकसान झालें तरी हरकत नाहीं. हे जगदाधारा, आतां तूंच मला आधार हो—

( सुनियो बालम मोरा )

शरणा हे करुणेशा ॥ धृ० ॥ भग्न भवीं या ॥
बिचरें गत जाया ॥ दाविं रे पथातें । सुराभरणा ॥ १ ॥
विषम विकारीं ॥ फाटे मन भारी ॥ तारिं रे पुरारी ।
करीं करुणा ॥ २ ॥

## ( अंक दुसरा समाप्त. )

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

( नंद यशोदा आसनस्थ )

( नृत्य गायन चाललें असतां गोप प्रवेश करितात. )

१ ला गोप—राजा, अरे हा अनर्थ तुझ्या एकछत्री राज्याखालीं चालला असतां डोळे झाकून स्वस्थ कसा बसला आहेस ?

नंद—काय ! अनर्थ ? आणि तो माझ्या राज्यांत !

२ रा गोप—राजा, ह्या अनर्थाचें मूळ तुझ्या घरांतच असून तूं कसा अंध झालास याचेंच मला आश्चर्य वाटतें !

नंद—काय ? अनर्थाचें मूळ माझ्या घरांत ?

३ रा गोप—महाराज, तुमचा कृष्णच या साऱ्या अनर्थाचें मूळ आहे, बरें का ?

नंद—माझा कृष्ण अनर्थाचें मूळ? तुह्मांला खरोखर वेड लागलें आहे—

( हसना चराके )

जगती प्रकाशी सदा जो स्वतेजें । करी श्वासमात्रें धरित्री
पुनीता । तया दूषितां निंदितां केंवि साजे ॥ धृ० ॥
हरोनी तमाला तपे जो मरीची । तया तापदायी ह्मणों
काय काजें ॥ न पाही स्वसौख्या परां सौख्य देतां । जगीं
तापहारी असा जो विराजे ॥ २ ॥

१ ला गोप—हल्लीं चालत असलेल्या ह्या छळालाच जर ताप सोसून रक्षण करणें ह्मणावयाचें असेल तर खुशाल ह्मणा. आह्मां मूढ बल्लवांनां तुमच्या राजनीतीचीं हीं मासलेवाईक तत्वें बरोबरशी कळत नाहींत, पण वस्तुस्थिति काय आहे ती आह्मीं पुढें मांडतों. वाटेल तसा न्याय करण्यास

आपण समर्थ आहांत. तुमुलराव, या असे पुढें; आणि तुमचें काय ह्मणणें असेल तें महाराजांसमोर मांडा.

२ रा गोप—काय सांगूं महाराज, ह्या कृष्णाचीं सर्व चरित्रें जर तुह्मांला सांगूं लागेन तर भयानें तुमचे कान बधीर होऊन जातील.

नंद—तुमचें काय ह्मणणें असेल तें सांगा. कृष्ण जरी माझा मुलगा असला तरीही त्याला योग्य शासन करण्यांत न्यायाच्या काट्यांचा समतोलपणा मी मुळींच बिघडूं देणार नाहीं. समजलांत ?

३ रा गोप—काय सांगूं महाराज, एके दिवशीं मथुरेच्या बाजारांत जाण्याकरितां आमची ही-तिला बरोबर घेऊन निघत होतों-इतक्यांत पहातों तर ही स्वारी आपल्या कुटाळ स्नेह्यांना बरोबर घेऊन पुढें आली ! ह्मटलें आली आज आमच्यावर गदा ! झालें आणि काय ? या राजश्रींनीं आमच्या त्या डोकीवरच्या उतरंडी खालीं उतरल्या आणि सर्वांनीं मिळून दुधादह्यावर यथेच्छ ताव मारिला. ( पेंद्या दरवाज्याच्या एका कोंपऱ्यांतून पटकन पुढें होतो. )

पेंद्या—काय हो राव, आणि दुसऱ्या दिवशीं आपल्या दह्यादुधाच्या उतरंडी आपोआप तुडुंब भरलेल्या मिळाल्या तें कुठें नाहीं सांगितलंत तें ? ( स्वगत ) मधुमंगलाच्या सांगण्याप्रमाणें ह्या मंडळीच्या मागून माझा हा मोडका पाय फरफटावित पळत आलों तो अगदीं वेळींच आलों ह्मणावयाचा !

१ ला गोप—अरे ! हें माकड एकदम येथें कोठून आलें !

नंद—पेंद्या, अरे नित्याचा मार्ग सोडून तूं हा मध्येंच कुठून आलास ?

पेंद्या—महाराज, ह्या आमच्या ग्रामस्थ मंडळींनीं मुंगीचा देखील रिघाव होणार नाहीं इतका दरवाजा गच्च भरून टाकिला आहे. तेंव्हां गर्दी करून आंत शिरतांना माझ्यासारख्या गरीब लंगड्या प्राण्याची हत्या यांच्या माथीं बसून राजद्वारीं आतांच प्रेतयात्रेचा समारंभ होऊं नये ह्मणून छपरावरून वळचणींतून उतरून खालीं आलों. ( स्वगत ) चोरी कराव-

याला जावयाच्या आगाऊ तयारीच्या धड्याची आज ही परीक्षाच झाली ह्मणावयाची. ( उघड ) क्षमा असावी, महाराज.

यशोदा—शाबास पेंद्या, आपल्या मित्राची योग्य वेळीं बाजू राखलीस.

पेंद्या—( स्वगत ) वाः आतां नाही मी भीत. आईसाहेबांचा देखील पाठिंबा मिळाला.

२ रा गोप—महाराज, माझी एक फिर्याद आहे पायापाशीं.

नंद—काय ह्मणणें आहे तुमचें ?

२ रा गोप—भलत्याच वेळीं येऊन दहींदुधाची मागणी करण्याचा कृष्णाचा कसा परिपाठ आहे हें तुमुलरावांनीं सांगितलेंच आहे. असेंच एकदा येऊन त्यानें मजकडे दहींदूध मागितलें. गोरस विकून उदरनिर्वाह करणारे आह्मीं गरीब लोक, दानालाच जर सर्व गोरस गेला तर विकावें काय आणि खावें काय ? मी अर्थातच नाहीं ह्मटलें. दुसरे दिवशीं मी मोठ्या पहांटे उठून गाई पिळावयाला निघालों. आगणांत पाय ठेविला मात्र आणि यानीं रात्रीं पसरून ठेविलेले सराटे पायाला असे बोंचलें. ह्मणत.-प्राण कासावीस झाला. मी तर मोठ्यानें ओरडूंच लागलों.

पेंद्या—योग्यच केलें. कांटे बोंचल्यावर तुह्मीं उगीच रहावें असें कोण ह्मणेल ?

२ रा गोप—माझी ओरड ऐकून घरधनीण मागील दारानें धांवत यावयाला निघाली पण या कारस्थांनी वाटेवर हांडा उपडा घालून ठेविला होता त्याला ठेंचाळून तोंडघशी पडली.

पेंद्या—माझ्या कृष्णाचा अपमान करणारी मंडळी अशीच तोंडघशी पडली पाहिजे !

२ रा गोप—सर्वांगाला सराटे बोंचले, आणि हातापायांची नुसती चाळण झाली.

पेंद्या—वा ! उत्तमच झालें ! आतां तिच्या सर्वांगांत खिळून राहिलेला अभिमान चांगला चाळून निघाला असेल.

२ रा गोप—एक महिना आम्ही आंथरूण धरून राहिलों होतों.

पेंद्या—वेडेपणाच हा ! अंथरुणें झोंपण्याकरितां केलेलीं असतात, धरून राहण्याकरितां नव्हेत.

२ गोप—आतां आपणच सांगा महाराज, हें कुठवर सहन करावें ?

पेंद्या—अहो तुह्मीं राव, तुह्मीं सराटे बोंचून पडल्यावेळीं आयतेवेळीं येऊन बोंचलेले सराटे स्वतःच्या हातानें कोणी बरें काढिले ? आजारीपणांत आईसारखें रात्रंदिवस जवळ बसून तुमची शुश्रूषा कृष्णानेंच केली ना ? दोष सांगतांना गुण कां लपवितां ? महाराज, पायापाशीं विनंति आहे. यांनीं सांगितलेली सर्व हकीगत खरी आहे. पण दारांत सराटे पसरण्यांत आणि उंबरठ्यावर उपडा हंडा ठेवण्यांत कृष्णाचें बिलकुल अंग नाहीं. तीं सर्व कृत्यें या पेंद्यानें केलीं.

१ ला गोप—महाराजांसमोर असल्या गोष्टी भरदरबारांत कबूल करायाला शरम नाहीं वाटत तुला ?

पेंद्या—मग काय ह्मणतां ? महाराजांच्या पायासमोर मी खोटें बोलूं ! यांकडा पेंद्या टवाळी करील, कुचाळी करील, नसत्या खोड्या करील पण असलें कृत्य त्याच्या कडून व्हावयाचें नाहीं. कुभांडें पुढें आणून सद्गुण लपविण्याची तुमची हातोटी तुह्मांलाच शोभते. महाराज, माझ्या कृष्णाचा उपमर्द माझे समोर केलेला मला काहीं खपत नाहीं. शिक्षा करण्याचा अधिकार महाराजांचा; पण घटकाभर तो हातीं घेऊन या उर्मट गोपाळांना मी सारखी अद्दल घडविली याची माफी असावी.

नंद—पेंद्या, हें तुझें करणें अगदीं अयोग्य झालें आहे. याबद्दल तुला शिक्षा करतांना सर्व गोष्टी तूं मोकळ्या मनानें कबूल केल्या आहेस हें आम्हीं ध्यानांत घेऊं.

३ रा गोप—महाराज, एवढ्यानें कुठें आटोपलें आहे ? ह्याच्याही पेक्षां विलक्षण गोष्ट ती पुढेंच आहे. नुसती आठवण होतांच अंगाची आग होते.

पेंद्या—थोडें सुविचाराचें पाणी वर ओता की !

३ रा गोप—काय सांगू महाराज—

( रणछोड रायजी )

छळि किति पाहीं । हें साहुं न ऐशा समर्या ॥ धृ० ॥
शिरुनि मंदिरिं हळु हा येई । शयनीं उभयां आह्मां पाही ॥
दाढी वेणिसि गांठी देई । बघतां बघतां पळुनि जाई जाई ॥१॥

पेंद्या—( हंसें आवरीत ) अयायिग, नुसती आठवण होतांच हंसतां हंसतां पोट फुटेल कीं काय असें वाटतें !

३ रा गोप—काय सांगू महाराज; सर्व हकिगत आपण ऐकाल तर अश्रूच गाळाल ( मधुमंगल दरबारच्या छपरावरून उतरून येतो )

मधु—हो—हो—आनंदाश्रु ना ? होय तर ! हः हः हः !

पेंद्या—वाः ! मधुमंगलानें देखील आमचीच वाट पसंत केली वाटतें !

३ रा गोप—( स्वगत ) छेः आतां हें दुसरें माकड आलें ! आतां कांहीं आमची धडगत नाहीं !

नंद—कां ? थांबलां कां ? काय झालें पुढें ?

३ रा गोप—काय सांगू महाराज !—

मधु—( मधेंच ) गरीब ब्राम्हणाचा आशिर्वाद घ्यावा, महाराज.

नंद—अरे मधुमंगल, तूं केव्हां आलास ?

मधु—हा आतांच आलों. हे आमचे दाढीसरदार महाराजांकडून अश्रू गाळविण्याची प्रतिज्ञा करीत होते तेव्हांच.

३ रा गोप—काय सांगूं महाराज !—

मधु—सांगा—सांगा—तुमची रडकथा महाराज !

३ गोप—खबरदार मध्येंच तोंड घालशील तर, भटुरड्या.

मधु—अहो, तुम्ही हें कुणाला बोलत आहांत ठाऊक आहे का !

**३ रा गोप**—आम्हांला दरडावणारे असे तुह्मींतरी कोण हो ?

**मधु**—तुम्हांला नाहीं का ठाऊक ? ज्यांची लाथ भगवंतांनीं आपल्या वक्षःस्थलावर धारण केली आहे त्या शापादपि शरादपि ब्राम्हणाचे आम्हीं वंशज ! समजलें ? अझून कांहीं कालियुग सुरू झालें नाहीं आणि ब्राम्हणांचें सत्वहि गेलें नाहीं. फार तोंड सोडाल तर शापून भस्म करून टाकीन.

**२ रा गोप**-तुह्मीं मोठे ब्राह्मण—नव्हे ब्रह्मराक्षस असलां ह्मणून काय झालें ? या राजकारणांत मध्येंच तोंड घालावयाचा तुह्मांला काय अधिकार ?

**मधु**—काय अधिकार ह्मणजे ? ( कृष्ण प्रवेश करितो ) या कुमार श्रीकृष्णाचे आह्मी मंत्री !

**नंद**—काय कृष्ण ?

**कृष्ण**—( पुढें होऊन ) बाबा, आज आहे काय हें ?

**यशोदा**—ये ये बाळ ! पहा या गोपांनीं तुझ्यावर आज केवढालीं किटाळें आणलीं आहेत तीं.

**नंद**—कृष्णा ! दूर उभा रहा. आज माझ्याजवळ येऊन बसावयाचा तुला अधिकार नाहीं. आज ह्या सर्व गोपांनीं तुझ्याविरुद्ध फिर्यादी आणल्या आहेत. ह्मणून तुला गुन्हेगार या नात्यानेंच वागलें पाहिजे !

**कृष्ण**—काय? माझ्या विरुद्ध फिर्यादी ?

**मधु**—कृष्णा ! कसल्या फिर्यादी आणि कसलें काय ? आज या साऱ्या गोपाळांनीं तुझ्याविरुद्ध कट करून तुला बांधून जेरीला आणावयाच्या उद्देशानें कुभांडाचा एक सांखळदंड तयार करून आणला आहे. आतां फक्त तूं पुढें होण्याचा अवकाश कीं अडकलासच ह्मणून समज.

**२ रा गोप**—छेः आतां हा त्रिवेणीसंगम झाला. आतां आमच्या सर्व खटपटीला यांत जलसमाधि मिळणार खास !

**नंद**—हं मग काय ह्मणत होतां तुह्मीं ?



रमणः—मी मद्यप्या सारखें वरळतों ? [५६]

सुवल काय बोलतां याचा विचार करा.

M. P. W.

३ रा गोप–कुठपर्यंत आलों होतों मी ?–हं काय सांगूं महाराज–

मधु–आज या स्वारीनें हें भाषण पाठ करून आणलें आहे वाटतें!

३ रा गोप–यांची चाहूल लागतांच यांना पकडावयाला ह्मणून घाई-घाईनें उठूं लागलों तों माझ्या दाढीला असा सडकून हिसका बसला कीं मला वाटलें माझी दाढी धरून कुणी तरी ओढली. पहिल्यानदां मला या कारस्थ्यांचाच संशय आला; पणआसपास चांचपडून पाहूं लागलों तों कोणी नाहीं आणि दाढीला मात्र हिसके बसत होते. ह्मटलें, तिला पण जागी करावी पण तिला जागी करूं लागलों तर ती पिशाच्चबाधा झाल्या-सारखी ओरडत उठली.

पेंद्या–अयायीग, आतां हें हंसें तरी कसें आंवरूं–

मधु–पेंद्या चूप–

३ रा गोप–ती ह्मणूं लागली ' वेणी ओढूं नका ' आणि तिनें वेणीला हात घालतांच माझ्या दाढीला हिसके बसूं लागले. मला वाटलें, हिच माझी दाढी ओढीत आहे. ती ह्मणूं लागली मीं तिची वेणी ओढली !

मधु–विष्णुपदावर वेणीदानच होणार होतें ह्मणावयाचें !

३ रा गोप–बायको झाली तरी नवऱ्याची अशी थट्टा कशी करील असें मला त्या वेळीं वाटलें सुद्धां नाहीं आणि मी तिचाच संशय घेऊं लागलों.

मधु–अहो, तुम्हीं या लग्नाच्या फदांत कां पडलां उगीच. आज जर तुह्मीं ब्रम्हचारी असतां तर हा प्रसंगच मुळीं आला नसता. इतकेंच नव्हे, तर जी दाढी तुमच्या अप्रतिष्ठेस कारण झाली तींच तुमची प्रतिष्ठा वाढ-वावयाला सहायभूत झाली असती.

पेंद्या–असेंच आहे बरें मधु. प्रत्येक मनुष्य आपली नसती प्रतिष्ठा वाढवावयाला म्हणून जी गोष्ट करतो ती गोष्ट शेवटीं त्याच्याच अप्रतिष्ठेला कारण होते. दह्याच्या डेऱ्यासारख्या यांच्या या वाटोळ्या गरगरीत शरीराला, डेऱ्याच्याच तोंडासारखें बारीक तोंड विशोभित दिसूं नये म्हणून यांनीं जो दाढीचा दादरा बांधला तोच शेवटीं गळफांस झाला.

**३ रा गोप**—अरे, चांडाळांनों, मला बोलूं द्याल कीं नाहीं. काय सांगूं महाराज, आमची अशी तारांबळ उडत आहे, इतक्यांत या नतद्रष्टांनीं दिवा पेटविला आणि हातांत असलेलें ढोलकें मोठ्यानें बडवलें; त्या सरशीं शेजारची सारी मंडळी धांवून आली-काय सांगूं महाराज—

**मधु**—तेव्हां मी रडत होतों म्हणून सांगा महाराज.

**३ रा गोप**—जमलेल्या साऱ्या मंडळीच्या हंसण्याच्या गोंगाटानें आमचें रडणें कुणालाहि ऐकूं जाईना.

**पेंद्या**—खरेंच तें. कुणी भोक्ता नसल्यास केलेली मेहेनत फुकट गेलीशी वाटते.

**३ रा गोप**—अरे उगीच रहारे चांडाळांनों, काय सांगूं महाराज—

(मागील पद पुढें)

**मजला राग फार ये तदा। हेही हांसति किति खदखदां।**
**बसली गांठ बहुत आपदा। जनही वदती सुटते**
**नाहीं नाहीं ॥ २ ॥**

**मधू**—एकूण केसासारख्या नुसत्या निर्जीव शास्त्रविधीनें बांधल्या जाणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या प्रेमपाशासारखाच हा दाढीवेणीचा पाश तुह्मांला अंतीं दुःखदायक झाला ह्मणावयाचा.

**२ रा गोप**—आतां तुह्मींच सांगा महाराज, हें सहन तरी कुठवर करावयाचें?

**पेंद्या**—अहो राव, मग कृष्णाची निंदा करणार नाहीं; मागितल्यावेळीं दान देईन; अशी कबुली करतांच दाढीवेणीची गांठ आपोआप कशी सुटली तें नाहींच का सांगावयाचें? वाः!

**२ रा गोप**—हें एक झालेंच. पण वेळीं अवेळीं पोरीसोरींना रानावनांत गांठून दान मागावयाचें हें तरी न्यायाला धरून आहे का?

**कृष्ण**—बाबा, अजाणपणानें कांहीं पोरकट चाळे माझ्याकडून झाले असतील, त्याबद्दल मी सर्वांची क्षमा मागतों; पण दानाविषयीं मात्र कांहींहि सबब ऐकणार नाहीं. गोपहो—

( वचन वदूं कठिण )

विनति असे सकल जना । करुण तुह्मी द्या ध्याना । मागतों कैसा मी दाना । पुरवुनी कामना ॥ धृ० ॥ कंस धाडि राक्षसां । छळूनि त्रास दे कसा ॥ सोडवीं मींच ना ? ॥ १ ॥

आणि एवढ्या मोठ्या जबाबदारीच्या कामाबद्दल मी जो अल्पसा मोबदला मागतो तोसुद्धां तुह्मीं नाकारावा ?

**१ ला गोप**—वाः ! हे पहा रमण इकडे येत आहेत. आता कृष्ण काय करतो पाहूं.

**रमण**—( प्रवेश करून ) राजा, तुझा जयजयकार असो.

**नंद**—कोण रमण ? या असे या असनावर बसा.

**रमण**—( स्वगत ) संसारांतूनच स्थानभ्रष्ठ झाल्यावर हें व्यावहारिक मोकळ सन्मानाचें आसन काय करावयाचें आहे ?

**नंद**—आज तुह्मीं इकडे कुणीकडे ?

**रमण**—राजा, काय सांगूं ? हे इतर गोप जसे आपापलीं गाऱ्हाणीं घेऊन आले आहेत तसाच मीही आलों आहें. मात्र यांना जशी उघड उघड आपली फिर्याद पुढे मांडतां येत आहे तशी माझी स्थिती नाहीं. फिर्याद न देतां अपराध्याला शिक्षा करावयाची विनंती करावी एवढाच माझ्या येण्याचा उद्देश आहे. राजा—

( भज रघुवर शामजुगल )

करि नतजनतापहरण सदया ॥ धृ० ॥ कुमतिछलतपें तप्त जहाले जन जातिल विलया ॥ १ ॥ तापद तव सुत कुमाति निवारणिं छाया न्याय दया ॥ २ ॥

**यशोदा**—आई जगदंबे, आतां तूच माझ्या कृष्णाला या संकटांतून सोडीव.

नंद–(स्वगत) रमणासारख्या विचारी मनुष्यानें देखील कृष्णा-विरुद्ध अशी वेडीवांकडी फिर्याद आणावी यापेक्षां दुर्दैवाचा कडेलोट तो कोणता राहिला ! (उघड) गोपहो, एकंदर परिस्थिति पाहतां कृष्ण फारसा अपराधी आहे असें कांहीं सिद्ध होत नाहीं. पण यावेळीं त्याला शिक्षा न केल्यास मीं स्वतःच्या मुलासाठीं अन्याय केला असेंच तुह्मी ह्मणाल. एकूण दोन्ही बाजूंनीं तुह्मीं मला संकटांत पाडलें आहे. अशा वेळीं मीं काय करूं हें तुह्मींच मला सांगा.

१ गोप–आह्मीं काय सांगावयाचें यांत ? कृष्णाला शिक्षा केलीत तर न्यायच झाला—न केलीत तर हे आह्मीं गोकुळ सोडून चाललों. काय असेंच कीं नाहीं तुमुलराव !

२ रा व ३ रा गोप–हो-हो-अगदीं अस्सेंच !

नंद–तर मग कृष्णाला शिक्षा केल्याखेरीज गत्यंतरच नाहीं. अशी अज्ञानी प्रजा मिळाली ह्मणजे राजालासुद्धां केव्हां केव्हां अन्यायाला न्यायाचें स्वरूप देणें भाग पडतें. लोकरंजनासाठीं मला मन कठोर केलेंच पाहिजे. पण कृष्णा—

(वाली उमरिया)

न्याया तुज बली देउं कसा रे । प्रेमहि सारें । फोलचि
कां रे ।। धृ० ।। राज्य न साचें । मूल सुखाचें । मूल
त्यजुनि तुज ऐसें राज्य नको रे ।। १ ।। राज्य नको हें
कष्ट न साहे । तुजविणें शून्य होई सकल असारें ।। २ ।।

कृष्ण–बाबा, असें संकटांत पडल्यासारखें कां बोलतां ? हे नागरिक निघून गेल्यावर तुह्मीं आह्मीं दोघांनींच या गोकुळांत नांदावयाचें काय ? हे सर्व नागरिक देखील आपलीं मुलेंच आहेत. इतक्या मुलांना दुःखांत ठेवण्यापेक्षां माझ्या एकट्याच्याच वियोगाचें दुःख आपण सहन करावें हें अधिक स्तुत्य नाहीं काय ? गोपहो—

(संसारिं न सुख या)

जातों व्रज त्यजुनि गमतों रिपुसम जरि उपरति परि
तुह्मांसि होइल ह्मणिं सकलां ।। धृ० ।। होइ भास असुखीं

नच परिमित सुख जरि जनासिं लव अनुभव तुह्मं दावुं
सेवुनि देह मम यमुना ॥ १ ॥ (जातो.)

३ रा गोप–अरे, कृष्ण गेला ! चला चला तो कुणीकडे जातो तें तरी पाहूं (जातात.)

यशोदा–अहो, पहा पहा कृष्ण खरोखरच गेला कीं काय तें ! (जाते.)

नंद–कृष्णा, माझ्या सत्वासाठीं तुला स्वार्थत्याग करावा लागला ना ! थांब थांब—हा मी आलों पहा—( जातो. )

मधु–( रमणाला ) काय हो, झालें ना तुमचें समाधान ? कृष्णाला घालवून द्यावयाचें श्रेय जर कुणाला द्यावयाचें असेल तर तें एक तुह्मांलाच.

पेंद्या–मधुमंगल, चल चल कृष्ण गेला आतां पहात काय बसला आहेस ? चल पळ ( दोघे जातात. )

रमण–बोलतां बोलतां काय झालें हें ! मी आलों काय, नंद महाराजांसमोर दोनच शब्द बोललों काय आणि कृष्ण गोकुळ सोडून जातो काय ! खरेंच बिलक्षण ! माझ्या एका शब्दासरशी कृष्णानें गोकुळ सोडून जावें असें मी बोललों तरी काय ! उद्वेगाच्या भरांत मी कांहीं भलतेंच बरळलों तर नाहीं ना ? कदाचित् बरळलोंहि असेन ! पण त्यामुळें ज्या ठिकाणीं यथेच्छ दांडगाई करितां येत असे असें हें गोकुळ सोडून कृष्णानें कां जावें ! काय विचित्र वर्तन हें ! हा खराच अवतारी पुरुष आहे काय ? याचें सर्वसाधारण वर्तन पाहिल्यास तें परस्परविरोधी दिसतें. पण इतरांच्या मनांत परस्पर विरोधी मनोविकार जागृत करण्याची याची हातोटी खरोखर अतर्क्य आहे. आतां माझीच काय स्थिती झाली आहे पहा !—

( आजवरी जैसी मजला )

कां नयनीं जल ये सहजें विगलित मन ही जाहलें॥ धृ० ॥
सोडी गोकुळ मम वचनानें । मानुं सुखातें ह्मणुनि मनानें ॥
हर्ष न वाटे परि तद्गमनें । ऊर कसें हें दाटलें ॥ १ ॥

**कृष्ण**–( प्रवेश करून ) रमणा—

**रमण**–( आश्चर्यानें ) काय कृष्ण ?

**कृष्ण**–होय. हाच तो तुझा कृष्ण. मी अजूनपर्यंत येथेंच आहे पाहून तुला आश्चर्य वाटत असेल पण तुला एक विनंती करावयाची राहिली ह्मणून मुद्दाम परत आलों.

**रमण**–काय ? मला विनंती ? तूं मला विनंती करणार ?

**कृष्ण**–होय. विनंती एवढीच कीं,

( सावलिया गिरधारी राम )

ठेविं विरोधी-भावातें । चिंती हृदयीं परि मातें । हृदयीं
अपुली ज्योती। तेथ पाहे माझी मूर्ती ॥ १ ॥ चिंती मातें
सगुणातें । साधर्म्या गति ये त्यातें । निंदी कोणी मातें
मुक्ति मिळते त्या जीवातें ॥ २ ॥

**रमण**–काय ? तुझ्याशीं विरोध करूं ?

**कृष्ण**–रमण, एकवार माझ्याकडे नीट पहा आणि मग विरोध किंवा प्रेम यांचा अंगिकार कर. पण तुला पुन्हां सांगतों, मनाचा एक निश्चय ठरविण्यापूर्वीं एकवार मला डोळे भरून पहा. पहा–पहा–हा पहा मी चाललों. एकदां यमुनेंत मी हा देह टाकल्यावर मग तुला पश्चात्ताप होईल. ह्मणून सांगतों, एकवार नीट निरखून मला पहा–पहा–पहा हा गेलों पहा.

**रमण**–थांब, कृष्णा, थांब. मला सरळपणें काय तें सांग ! तूं निंदकांचा बंदीजन! तुझ्याशीं विरोध करूं! तुझ्यासारख्या जगन्मोहनाशीं ! थांब कृष्णा (हात पसरून) मला तुझी क्षमा मागूं दे ! (थांबून) क्षमा ? तुझी क्षमा ? मी मागूं ? ती कां ह्मणून ? तूं माझ्या सर्व सुखावर पाणी ओतलेंस ! माझ्या सर्व सुखाची राखरांगोळी तूं केलीस ! तुझ्याशीं विरोध! विरोधाखेरीज कांहीं नाहीं ! पण प्राणेश्वरा तुझ्याशीं विरोध कसा करूं ? तूं माझ्या हृदयांतील ज्योती ( मोठा प्रकाश पडून कृष्ण नाहींसा होतो ) थांब–थांब कृष्णा–तुला माझी थोडा तरी कींव येऊं दे ! पुन्हां एकवार तरी माझ्या-

कडे पहा—हृदयांत बाणशल्याप्रमाणें भेदून जाणाऱ्या तुझ्या चंचल नेत्रांनीं एकच वार माझ्याकडे पहारे! कृष्णा—

(तुझे क्या किया)

**मन पोळलें । किति बापुडें । नच नेत्र ढळे । तुज ठायिं**
**जुळे । मम कोप नुरे । अभिमान जिरे मति एक ठरे ।**
**तुज आकळिलें ॥ धृ० ॥ स्थितप्रज्ञ जरी जन हा नसला ।**
**नुमजे तुजला । सहजीं फसला । भवभासगुणें । जरि**
**बुद्धि मळे । प्रणयौघ अतां तव पायिं वळे ॥ १ ॥**

काय ? माझा कृष्ण गेला ? नाहीं. तो नुसता भास ! कृष्ण तर एथेंच आहे. हा येथें—येथें—सर्वत्र कृष्ण! हे कृष्ण आहेत तरी किती! एक—दोन—तीन—छेः मोजतां येणेंच शक्य नाहीं ! कोटिशः कृष्णांनीं मला चोहींकडून वेढून टाकलें आहे ! हें सर्व जगच नाहींसें झालें ! वृक्ष नाहीं; लता नाहीं; भूमि नाहीं; आकाश नाहीं ! हवेंतील प्रत्येक सूक्ष्म परमाणु कृष्णच ! हें झालें तरी काय ! हे कृष्णच सर्व चराचर व्यापून राहिलेले दिसत आहेत. मग मी 'जातों' ह्मणून सांगणारा माझा कृष्ण कुठें गेला ! माझा कृष्ण ! माझा ह्मणजे-कुणाचा ! मी—मी कोण ! मी तर महापापी रमण ! हरहर ! एकाच दृष्टि-निक्षेपानें यानें माझी काय स्थिति केली ही ! मी पुरुष-जीवकोटींतील श्रेष्ठतम प्राणी—उदात्त गंभीरतेचें निवासस्थान ! मग सौंदर्यवान् पुरुषांसाठीं काम-विव्हल झालेल्या एखाद्या तरुणीप्रमाणें मी प्रणयमूढ कां झालों! माझ्या-सारख्या निग्रही पुरुषांची ही स्थिति ! मग राधा तर केवळ अबला ! हं—आतां मी समजलों—हा विकार नव्हे—हा विकास आहे; हे विलास नव्हेत—हा विहार आहे; ही मदनबाधा नव्हे—ही शुद्ध प्रेमाची लहरी आहे; राधे—प्रियतमे—केवढा अपराधी मी ! उगीच तुला दूषण देत आलों! पण आतां कुठल्या तोंडानें तिची क्षमा मागूं! कृष्णाला गोकुळांतून नाहींसा कराव-याला मीच कारणीभूत झालों ना ! मूढा रमणा, आतां व्यर्थ आक्रोश कशाला करतोस ? जा आतां तिचीच करुणा भाक. पण सर्व अपराध करूनहि ती क्षमा करील काय ! करील. खास करील. ती या पाषाण-हृदयी रमणासारखी निर्दय नाहीं—

( करी मघवा तव कार्य )

जरी मजला दे दोष कारणें या । सकल दोषा मी पात्र
होइं वाया ॥ सरल हृदयें मम ताप कथिन नाना ।
क्षमाशीला वंचील का अजाणा ॥ १ ॥

( जातो )

## प्रवेश दुसरा.

( सुबल, मधुमंगल व पेंद्या )

**सुबल**—हें पहा मधुमंगल, पेंद्या, तुम्हांला मी एकच गोष्ट सांगून ठेवतो एवढी पूर्णपणें लक्षांत बाळगा. कृष्ण अवतारी पुरुष आहे हें आपल्याला कळलेंच आहे. तेव्हां कालिया डोहांत त्याला अपाय होईल असें मानणें म्हणजे वेडेपणाच होय. असे घाबरूं नका. थोडा धीर धरा. कृष्ण खात्रीनें परत येईल.

**पेंद्या**—उपदेश करणें जितकें सोपें आहे तितकें धीर धरणें सोपें नाहीं. तो कांहीं नुसत्या पाण्याचा डोह नव्हे कीं कृष्ण पोहून दुसऱ्या तीराला जाईल ! कालियाच्या जलाल विषाचें आगर तें ! हें समजून देखील धीर कसा धरावयाचा ? मला तर आतां अशीच जाऊन डोहांत उडी घ्यावी असें वाटूं लागलें आहे.

**सुबल**—डोहांत उडी घेतल्यानें कृष्ण भेटेल असें कां तुला वाटतें ?

**मधु**—मग आतां करावें काय तें तरी सांग ! कृष्णानें कालियाडोहांत उडी घेतल्याचें स्वतःच्या डोळ्यानें पाहिल्यावरसुद्धां धीर धरावयाचा तरी कसा आणि तो कुणाच्या आधारावर ? आपली तर बुवा कांहींच अक्कल चालत नाहीं.

**पेंद्या**—तुझी नुसती अक्कलच चालत नाहीं पण माझे पाय सुद्धां लुले पडले आहेत.

**सुबल**—हें पहा मधुमंगल, सध्यां आपल्याला स्वस्थ रहावयाला दुसराहि एक आधार आहे. तूं बळिराम दादांकडे पाहिलेंस ना ? ते तुझ्या-



रमणः—काय ? तुझ्याशीं विरोध करूं ? [७०]

M. P. W.

सारखें थयमान करताहेत का ? कृष्णासारखा भाऊ नाहींसा झाला असूनही ते कांहींतरी तसेंच सबळ कारण असल्याखेरीज स्वस्थ बसतील कसे ? तेच जर स्वस्थ बसले आहेत मग आपण तरी उतावीळ कां व्हावें? उठल्यामुटल्या बोलघेवडेपणा करण्यांत जरी आह्मी फार कुशल असतों तरी संकटाच्या वेळीं काय करावें हें समजण्याइतकें प्रसंगावधान आमच्यांत खास नाहीं. तेव्हां आतां धीर धरून स्वस्थ बसा असें मी तुह्मांला सांगितलें तें योग्य आहे कीं नाहीं तुह्मीच सांगा.

**पेंद्या**—पुरे दोन प्रहर हा तुमचा काथ्याकूट सुरूं आहे पण आरंभाइतकेच आतांपर्यंत कोरडे ठणठणीत ! माझ्या या पोकळ डोक्यांत ईश्वरानें, थोडीशी तरी अक्कल घातली असती तर केव्हांच मी याला एखादा सुरेखसा उपाय शोधून काढला असता !

**सुबल**—पेंद्या, खरा अक्कलवान् तूंच. कारण स्वतःला अक्कल नाहीं एवढें तरी तुला समजत आहे, हें काहीं थोडें नाहीं. आह्मांला आमच्या अकलेबद्दल मोठा अभिमान असतो खरा, पण प्रसंगीं आमचा पोकळडोकेपणा प्रत्ययाला येत असूनहीं तो कबूल करावयाला मात्र आह्मीं तयार नसतों.

**मधु**—आतां तुमचीं हीं तत्वज्ञानें पुरे नाहीं का झालीं ? कांहीं सुचत असेल तर सांगा नाहींतर तुमचीं तीं डोकीं एखाद्या दगडावर तरी आपटा ह्मणजे तुह्मी नाहींतर नाहीं—पण सारें जग तरी तुमचा पोकळडोकेपणा कबूल करील.

**सुबल**—मधुमंगल, नारदमुनींचा शब्द मोडून उद्वेगाच्या भरांत अवताररहस्य रमणाला मी सांगितलें त्यामुळें उपाय व्हावयाच्या ऐवजीं अपाय मात्र झाला; रमण अधिकच चिडला गेला आणि त्यामुळेंच शेवटीं आह्मीं कृष्णाला अंतरलों. आतां पुढें काय करावें हें सांगावयाला मी पात्र नाहीं हें एवढ्यावरूनच सिद्ध होत आहे. बरें, आतां कुणाचा तरी सल्ला घ्यावयाचा, पण विचारावयाचें तरी कुणाला ! कारण नंद महाराज आणि यशोदा राणी स्वतःच हताश झालीं आहेत; राधेचा मुळीं पत्ताच नाहीं—

मधु--आणि असता तरी तिचा काय उपयोग होता ह्मणा !

सुबल--बळिराम दादा सर्वांनाच सरसकट मूर्ख ठरवीत आहेत

पेंद्या--आणि तेंही कांहीं खोटें नव्हे !

सुबल--यावेळीं नारदमुनी जर येथें असते तर त्यांना कांहीं तरी विचारतां आलें असतें.

नारद--( प्रवेश करून ) हा मी येथेंच आहें. बाळांनों मी तुह्माला कोणतें साहाय्य करूं !

सुबल--भगवन्, संकटाच्या वेळीं धावून येऊन आपण ब्रीद राखलें.

मधु--कृष्णाविषयींची सारी हकीगत आपल्याला कळलीच असेल. भगवन्, आतां आमची काय स्थिती होणार हें आपणच पहा. आजपर्यंत कृष्णाच्या आधारावर कुणालाच जुमानलें नाहीं. आतां आह्मी निराधार झालेले पाहून पूर्वींचा दावा साधण्याकरितां जो भेटेल तो आह्मांला तोडतोडून खात आहे. नवऱ्याच्या मागें विधवा झालेल्या स्त्रीची जी स्थिती तीच आतां आमची झाली आहे. यावेळी आपणच जर आह्मांला आश्रय द्याल तर आमची धडगत आहे. समर्थाच्या पाठिंब्याशिवाय आमच्या हातून काय होणार आहे !

पेंद्या--मोठमोठ्यांनीं हात टेकले तेथें ही साडेसाती काय सांगणार ? या बोवांनीं नुसत्या कळी लावाव्या आणि गंमत पहात बसावें. ह्यांनीं लोकांवर नुसते प्रसंग आणावे, पण प्रसंगीं यांचा काडीचा देखील उपयोग व्हावयाचा नाहीं.

सुबल--पेंद्या, आजपर्यंत केलेल्या साधुनिंदेचीं फळें भोगीत असूनही अजून तुझे डोळे उघडत नाहींत ना ? जा-मुनिवर्यांची क्षमा माग. त्यांचे पाय धर.

नारद--अरे वेड्यांनों, असे हताश कां होतां ? कृष्ण कालिया डोहांत नाहींसा झाला ह्मणूनच ना ? त्यांत एवढें हताश होण्याजोगें काय आहे ?

**पेंद्या**—हताश होऊं नये तर करावें तरी काय? डोहांत शिड्या सोडल्या; दोरखंडें टाकलीं, गळ टाकून पाहिले पण सारें व्यर्थ. आतां कुणी तरी डोहांत उतरून पहावयाचें; पण कालियाच्या विषाच्या ज्वाळांपुढें आंत उतरावयाची कुणाची छाती आहे ? तेव्हां आतां तुह्मीच सांगा, आह्मी रडत बसूं नये तर करावें तरी काय ?

**नारद**—इतके दिवस कृष्णाच्या सहवासाचा लाभ मिळुनही फुकट रे फुकट ! अरे, गळ टाकून कां तुह्मांला कृष्ण सांपडणार आहे ? ज्याच्यापासून सर्व कलांची उत्पत्ति त्याचा शोध लावावयाला अशी कोणती कला समर्थ आहे ?

( भजन बिना )

सकल कला जागें हरिविण विफला ॥ धृ० ॥ भवनगीं
रमलां । विभव विसरलां । नग हरला । विभवीं फसलां ।
देहचि धरिला । हरिसि विसरलां । हरि मुकलां ।
सुखही चुकलां ॥ २ ॥

**पेंद्या**—पण याला पुढें उपाय काय ?

**नारद**—उपाय ? कसला उपाय ? कृष्ण गेला ना? झालें. आतां स्वस्थ बसा.

**पेंद्या**—ह्मणजे ? कृष्ण ईश्वराचा अवतार आहे ह्मणून आपणच सांगितलें ना ? ईश्वराला कधीं कालिया खाईल काय ? आमचा कृष्ण आह्मांला आणून द्या नाहींतर हे तुमच्यासारखे साधुलोक लोकांत आपली प्रतिष्ठा वाढविण्याकरितां नुसता फसवेगिरीचा बाजार मांडतात असा मी जिकडे तिकडे डांगोरा पिटीन !

**नारद**—मी तुह्मांला कां फसवीन ? कृष्ण ईश्वर आहे अशी जर तुमची खात्री पटली आहे तर असें आकांडतांडव कां करितां ? आपलें अवतारकृत्य आटोपतें घेण्याचीच जर त्याची इच्छा असली तर तिच्याआड कोण येणार आहे ?

**मधु**—म्हणजे कृष्णासाठीं आम्हीं इकडे तळमळत रहावें आणि त्यानें तिकडे खुशाल कालियाडोहांत नाहींतर क्षिरसागरांत झोंपा काढाव्या हें

शोभतें कां या ईश्वराला ? आमचें दुःख जर त्याला कळत नाहीं तर तो सर्वज्ञ कसला ?

**नारद**—पण तुम्हांला मुळीं दुःखच जर झालें नाहीं तर त्यानें तें जाणावें तरी कसें !

**पेंद्या**—हें काय बोलणें झालें ! जो सर्वस्वी आमच्या सुखाची काळजी वहात होता तो नाहींसा झाल्यानें आम्हांला दुःख व्हावयाचें नाहीं तर व्हावयाचें तरी कुणाला ! आम्ही त्याच्यावर प्रेम करीत राहिलों त्याचें हेंच कां फळ !

**नारद**—ज्या प्रकारचें हें तुमचें प्रेम त्या प्रकारचेंच हें फळ. कृष्णासारख्या राजकुलांतील श्रेष्ठ पुरुषाचे आपण मित्र म्हणून मिरवावें आणि त्यावर हवी तशी आपली चैन चालवून घ्यावी एवढीच तुमची महत्वाकांक्षा ! ती सफल झाली. खरोखर कृष्णवियोगाचें प्रदर्शन करणारा तुमच्यासारखा एकही प्राणि या गोकुळांत नाहीं हें सर्वांनीं कबूल केलें. झालें—एवढेंच. ईश्वररूपी कल्पवृक्षानें तुमच्या इच्छेइतकेंच तुम्हांला फळ दिलें. पण हें प्रेम नव्हे, हा नुसता स्वार्थ आहे. याच स्वार्थाची व्यापकरीतीनें परमावधीची एकतानता झाली तरच तें शुद्ध प्रेम. पण तुमचा हा स्वार्थ एकदेशीय—स्वतःच्या जीवाला सुख मानून घेण्यापुरता—म्हणजे केवळ फोल, अर्थात् त्याचें फलही फोलच. हा अज्ञानाचा पडदा काढून टाकल्याशिवाय प्रेमाचें उज्वल स्वरूप तुम्हाला केव्हांही कळणार नाहीं. तुम्हीं असे तळमळत आहां पण ती राधा पहा—

**पेंद्या**—त्या राधेचें नांव सुद्धां काढूं नका. कृष्णप्रेमाची केवढी शेखी मिरवित होती ! पण कृष्ण नाहींसा झाला हें कळूनही ती डोळे मिटून स्वस्थ बसली आहे. लोकदेखील एवढ्यावरूनच तिला नांवें ठेवीत आहेत.

**नारद**—ज्याला आपल्या प्रेमाचें प्रदर्शन करावयाची इच्छा नाहीं त्यानें लोकांची चाड कां बाळगावी ? अरे, हे लोक नुसती वायफळ बडबड करणारे आहेत. खऱ्या कळकळीचा लवलेशसुद्धां यांच्या मनाला शिवत नसतो. आज हे नाकें मुरडीत आहेत पण उद्यां कांहीं चमत्कार घडून येतांच माना डोलवूं लागतील. एकूण यांची निंदा जेवढी पोकळ

तेवढीच स्तुतीही बाष्कळ होय. अशा लोकांना आपलें वियोगदुःख दिसूं देण्यांत काय फायदा आहे. दुःख झालें, मनांत ठेवावें आणि जें कांही करणें तें कुणाच्या निंदेची पर्वा किंवा स्तुतीची अपेक्षा न करितां निमूटपणें करावें.

सुबल—भगवन्, मध्येंच बोलतों याची क्षमा असावी. पण प्रत्यक्ष आईबापाच्या दुःखाकडे लक्ष्य न देणें हें त्याच्या सर्वज्ञतेला विपरीत दिसत नाहीं काय ?

नारद—आईबापाचें दुःख तें केवळ हातपायगाळणें ! कल्पवृक्षाखालीं नुसतें रडत बसणें ! कल्पतरू आपल्याला हवें तें देतो खरें, पण मागितल्याशिवाय तो काय देईल ? मागा ह्मणजे मिळेल.

पेंद्या— मग आह्मीं काय स्वस्थ बसलों आहोंत ? आमचा हा दोन तीन प्रहर सारखा अट्टाहास चालला आहे. त्याचें आह्मीं असेच रडत रहावें हेंच कां फळ ?

नारद—फलासाठीं नुसती ओरड कां करतां ? कल्पतरूकडे रडत बसलां तर रडत ठेवणें हेंच कल्पतरूचें काम. कर्तव्यपूर्तिवांचून फल कसें मिळेल ? तुमच्या अश्रूंनीं यमुना नदीला पूर येऊन सारें गोकुळ वाहून गेलें ह्मणजे तुह्मीं कर्तव्यमुक्त झालां असें का तुह्मांला वाटतें ? तुह्मीं आक्रोश करीत अहांत तो कृष्णावर तुमचें प्रेम आहे ह्मणून ना ? कृष्ण तुह्मांला निरंतर जवळ पाहिजे, त्यावांचून तुमचे प्राण कासाविस होतात, ह्मणूनच ना ? मग कृष्णावांचून एवढा वेळ तुह्मीं जिवंत कसे राहिलांत ? नुसता शोक करून स्वतःच्या देहाला त्रास देण्यापलीकडे तुह्मीं कृष्ण प्राप्तिकरतां अधिक ते काय केलें ? आक्रोश करणें हा नेभळेपणा; उच्छृंखलपणा हें मद्यप्याचें लक्षण ! हीं दोन्ही टाका. कोणतीही परिस्थिति हृदयाला झोंबल्याशिवाय पूर्ण मनोजागृति होत नाहीं आणि मनोजागृति झाल्याशिवाय कर्तव्य निष्ठापूर्वक बजाविलें जात नाहीं. कर्तव्य करावयाचें तें देखील फलाची अपेक्षा साफ सोडून केलें पाहिजे. तरीही पण फलाचा जो कालावधि ठरला असेल त्यापूर्वीं फल केव्हांही मिळणार नाहीं. फल मिळत नाहीं ह्मणून उतावीळ होणें हें असमंजसपणाचें लक्षण आहेच, पण फल एकदम मिळालें नाहीं म्हणून मुळींच कर्तव्यपराङ्मुख

होणें हा तर शुद्ध मूर्खपणा ! पण तुम्ही तर मुळीं कर्तव्यच चुकतां आणि फलाची नुसती अपेक्षाच नव्हे—तर आत्यंतिक उत्कंठा बाळगतां ! तुम्हांला फल कां मिळावें ?

**सुबल**—क्षमा करा भगवन्. आमचें कर्तव्य काय तेवढेंच एकदां आम्हांला स्पष्टपणें शिकवा.

**नारद**—तुह्मांला तुमच्या कर्तव्याची पुरी ओळख पाहिजे असल्यास माझ्या बरोबर यमुनातीरीं चला. तेथें मी तुह्मांला त्याचें प्रत्यक्ष उदाहरणच दाखवितों.

**तिघे**—जशी आज्ञा. ( सर्व जातात )

## प्रवेश तिसरा.

**रमण**—एकच दिवसांत माझ्या वृत्तींत काय फरक झाला हा !

( झाली खचिताचि )

**येई अभिनव मज ही दशा ॥ अनुचित कृतिला वरुनि अशा ॥ धृ० ॥ कांपे थरथर कैसी तनुही । कंठ भरोनी तैसा येई । विकल हृदय हें कंपित होई । भेटे हरि काधिं मज विवशा ॥ १ ॥**

पूर्वी विरोधांत देखील हेच विकार, पण त्यांचा परिणाम मात्र संताप आणि आतां त्याच विकारांचा परिणाम सुखदायी वाटतो. मला वाटतें, नुसत्या विकारांवरून प्रेम किंवा विरोध ओळखणें मुळींच शक्य नाहीं; त्यांच्या परिणामाच्या भिन्नत्वाकडेच पहावं लागेल. आतांच पहाना जे विकार पूर्वी मला कठोर भासत होते, तेच भक्तीच्या संस्कारामुळें किती मधुर वाटत आहेत ! पण तेच उलट व्यवहारांत पहा. पूर्वींच्या विरहावस्थेंत जी वनश्री आपल्या उदास छायेमुळें मला आनंददायी होत असे तीच आतां रम्य दिसत असुनही माझ्या मनाला मात्र उदासीन करीत आहे. ( थांबून ) काय ! मी विलासवनांत येऊन पोंहोचलों ! विचाराच्या भरांत मी येथें केव्हां आलों तें समजलें सुद्धां नाहीं. छेः छेः ! आज मी

स्वतःलाच विसरून जात चाललों आहें. अरे! पण या शिलातलावर ही मूर्ति कुठून आली! विलासवनांत कुणाचीही मूर्ति स्थापन केल्याचें मला यावेळीं तरी आठवत नाहीं. (पाहून) अहाहा! ही तर माझी हृदय-देवता! माझी राधा! खरीच का ही माझी राधा! (राधा शिलातलावर बसलेली दिसते) मग मी जवळ येतांच ही उठून कशी गेली नाहीं? अशी निश्चल कां? देहव्यवसाय चालावणारी ईश्वरी ज्योती या देहांतून गेली तर नाहींना! (पाहून) नाहीं. कारण—

(भोर कहि मिलन)

**सोडि न लवभरि सुषमा प्रतिमा, ही सकलशमा, वाटते**
**जरि मृता निरुपमा ॥ धृ० ॥ स्तंभित करिही जरि निःश्वासा।**
**चंचलता कां दिसते नासा। मधुरोष्ठीं करि हास्य विलासा।**
**विमल कपोलीं सुरस रक्तिमा ॥ १ ॥**

मग ही अशी स्तब्ध कां? सच्चिदानंद स्वरूपांत तादात्म्य पावून परोक्षतेनें त्या स्वरूपाचा अनुभव घेतांना जी समाधि नांवाची स्थिती प्राप्त होत असते त्या स्थितींत तर ही नसेल ना! हेंच तें विलासवन; हेंच तें शिलातल; हीच ती राधा. पण कालच्या आणि आजच्या माझ्या मना-वरील परिणामांत किती अंतर आहे बरें! याच विलासवनांत याच शिला-तलावर याच स्थितींत हिलाच पाहून काल मी हताश झालों. पण आज-अहाहा! राधे -प्रियतमे—काय हिला ऐकूच येत नाहीं काय? हाच जर श्रीकृष्णाच्या मुरलीचा मधुरध्वनी असता तर ही एकदम उठून धांव-लीच असती! अहाहा! त्या वेणुरवाच्या नुसत्या स्मरणानेंच मी पुलकित झालो. हे कृष्णाधरचुंबिके वंशनालिके, खरोखर तूं धन्य आहेस—

(मांग मधुर नूपर)

**वेणु मधुर मंगलरव रेणु वासित करिती भुवनतला ॥ धृ० ॥**
**मत्त चकित हंसीचा रव कीं भृंगकुलाच्या निनदकला ॥ १ ॥**
**ही हृद्‌शी वंशी वाटे प्रणयसमरभेरी मजला ॥ २ ॥**

राधा—(जागी होऊन) काय वेणू! कुठें आहे! माझ्या हृदय-समुद्राला भरतें आणणारी ती कृष्णप्रिया कुठें आहे! (इकडे तिकडे

पहाते ) अगबाई ! पण हे कोण ! कोण ह्मणजे ! माझा श्याम. ये, ये, हृदयनिवासा वरकांती दोन दिसणाऱ्या ह्या हृदयांचे. एकीकरण कर.—

**रमण**—प्राणेश्वरी, तुझ्या शुद्ध प्रेमाला अपात्र ठरलेल्या या रमणाला तूं ओळखलें नाहींस काय ?

**राधा**—रमण ! कुठला रमण !

**रमण**—राधेचा रमण.

**राधा**—राधेचा रमण ! छेः राधारमण एकच. राधारमण श्रीकृष्ण.

**रमण**—हाय हाय ! ही मला ओळखावयालासुद्धां विसरली !

**राधा**—तुह्मीं येथें कां आलां ! काय हवें तुह्मांला !

**रमण**—मला ! मला कृष्णप्रेम पाहिजे !

**राधा**—काय कृष्णप्रेम ! या तर मग-तुह्मांला कृष्णप्रेमच जर हवें असेल तर इकडेच या. अगदीं योग्य वेळीं—योग्य स्थलीं तुह्मीं आलांत. गोकुळाखेरीज इतर कुठेंही कृष्णप्रेम मिळणं शक्य नाहीं. कारण—

( इतनी मोहब्बत प्यारमें )

विज्ञान शुद्ध रहस्य जें भांडार त्याचें जें असे ॥ कैवल्य-
दायक सत्वरजतम मुक्त तें येथें वसे ॥ कर्मबंधध्वंस-
नाची प्रज्वलित जी असिलता ॥ गोकुलीं या पाहतां ती
अमृतसरिता वाहतां ॥ चला चला हो विषयवन्हिखर-
दाहतृषित जन सारे । मधुर भक्तिपीयूषसरोवर वाहे
येथ असारे ॥ १॥

**रमण**—कृष्णप्रेमाची ही परमावधि झाली !

**राधा**—क्षुधा आणि तृषा एकच वेळीं शमविणारें हें कृष्णप्रेमाचें पेय देण्याकरितां या पाणपोईवर माझी योजना केली आहे. या ! असे पुढें या. या अमृतानें आंतून बाहेरून मी तुम्हांला सचैल स्नान घालतें.

**रमण**—आतां काय करावें ! ही ताळ्यावर येणार कशी !

**राधा**—अहो कृष्णप्रेमाची इच्छा करणारे सकल जन हो—हें गोकुल हें कृष्णाचें मंदीर पहा—



रमण: - पण मला आतां कृष्ण कसा भेटेल ? [८२]

( नये जोबनबालीका )

हरिगृहिं उघड्या, चला उठा ॥ भरी पिसें जरि निवे-
शितां या चला उठा ॥ धृ० ॥
प्रेमज तैलें भक्तिदीपिका मार्ग दाविते चला उठा ॥ १ ॥
मन हरिपायीं अविरत राही तरिच हरि भवा चला
उठा ॥ २ ॥

**रमण**—छेः ही तर फारच भडकत चालली! हे कृष्णप्रेममयी देवी राधे—

( कान्हा छांड बैया )

दावीं सत्पथातें। या विषयीं मन जातें रमत न तेथें ॥धृ०॥
भव असुखद मज कळलें। विषय-गरलिं मन भ्यालें।
हरिपद मज सुलभ होइ। अशि सांग मात ॥ १ ॥

**राधा**—काळीज तुटून हंबरडा फोडल्याशिवाय भगवंताची भेट होणें शक्यच नाहीं. करुणा भाका ह्मणजे त्याला करुणा येईल.

**रमण**—आतां मी कुठल्या तोंडानें त्याची करूणा भाकूं! मी ईशद्रोही—महापापी—चांडाळ—माझ्या दर्शनानें सुद्धां इतरांना पाप लागेल! राधे; आतां तुलाच माझी कींव येऊं दे ग!

**राधा**—माझ्यावर तुमचा विश्वास असेल तर या मजबरोबर. मीच तुह्मांला कृष्णप्राप्ति करून देतें.

**रमण**—तें तर आतां अशक्यच, कृष्ण तर कालिया डोहांत नाहींसा झाला.

**राधा**—काय कृष्ण गोकुळ सोडून गेला? अशक्य! अगदीं अशक्य! आपल्या भक्तांना संकटांत ठेवून अवताराचें कार्य पूर्ण केल्याशिवाय कृष्ण जाईल? नाहीं. तुह्मांला कृष्ण पाहिजे असेल तर या माझ्याबरोबर. जेथें राधा आहे तेथें कृष्ण आहेच् आहे. ( जाऊं लागते )

**रमण**—(तिचा हात धरून) थांब, थांब, हा पहा, मीही तुझ्याबरोबर येतों.

**राधा**—( सावध होऊन हात सोडवून दूर होते ) अगबाई, केव्हां येणें झालें तें मी पाहिलेंसुद्धां नाहीं!

**रमण**—राधे, ही औपचारिक लाज आतां कशाला पाहिजे! हा तो पूर्वींचा रमण नव्हे. श्रीकृष्णाची कृपा संपादन करण्यासाठीं तुझी क्षमा

मागावयाला उत्सुक असलेला हा अनुतापी रमणच आतां तुझ्या पुढें उभा आहे.

**राधा**—अहाहा ! आज मी धन्य झालें ! माझ्या कृष्णाला आपण शेवटीं ओळखलें.

**रमण**—पण मला आतां कृष्ण कसा भेटेल ?

**राधा**—त्यांत एवढें कठीण तें काय आहे !—

( प्यारी प्यारी सुरतोंपे )

**मति जरी पदीं दृढ झाली । तरी असे सुलभ वनमाली ।**
**रमण—तुजविणें कुणि न मज वाली ॥ धृ० ॥**
**राधा—चरणयुगलीं । शरण जावें । नित्य ध्यावें । त्या भजावें ।**
**रमण—हतबल मन मम समय कठिण। करिं मातें सौख्यशाली ॥१॥**

## प्रवेश चवथा.

( नंद, यशोदा, वराई व इतर गोप )

**नंद**—हरहर ! कृष्णा, शेवटीं सन्मार्गानें वागतांना मी तुला मुकलों ना !—

( रघु राया सदया )

**अभिरामा शामा । हे सुखधामा । त्यजिसि कां आणुनियां ही स्थिति विषमा ॥ धृ० ॥ मज भासतें सदन उदास हें ॥ असुभार गमे वरिन यमा ॥ १ ॥ तुजवीण ह्मणे तात कुणीं । मज मधुवचिं सांग अशा अधमा ॥ २ ॥**

**३ रा गोप**—महाराज, आतां हा शोक आवरा. आह्मी तरी आतां कोणत्या तोंडानें आपलें सांत्वन करावयाचें ? आह्मींच अधम ह्मणून आपल्याला या संकटांत पाडलें.

**यशोदा**—तुह्मी तरी उगीच कां वाईट वाटून घेतां ? फिर्याद आणावयाची तुह्माला बुद्धि झाली हें आमचेंच दुर्दैव. त्यांत तुमचा तरी काय दोष ?

**वराई**—आतां झाल्यागेल्या गोष्टी परत का येणार आहेत ? उगीच शोक करण्यांत काय अर्थ आहे ? मी खरोखर सांगतें, आपल्या हातून संकष्टचतुर्थी व्रतांत कांहीं तरी प्रमाद घडला असला पाहिजे, एरव्हीं असें कधींहि झालें नसतें.

**यशोदा**—प्रत्यक्ष भगवंताला संकष्टचतुर्थीव्रताच्या भंगामुळें काय होणार आहे ? सर्व दैवतेंच ज्याच्यापासून उत्पन्न झालीं त्याला हीं असलीं क्षुल्लक दैवतें काय करूं शकतील ? आह्मींच हतभागी ह्मणून कृष्णासारखा पुत्र मिळूनही शेवटीं अनाथ झालों. हायरे बाळा कृष्णा—

( नित काग उडादी मै )

**नच काय दया हृदया । सखया । जासि कसा मज सोडुनियां ॥ धृ० ॥ सकल जगाची तूंची माता । मातृ-हृदय कां विसरसि आतां । लोटुनि शोकीं अह्मां उभयां ॥१॥**

(नारद, सुबल, मधुमंगल, पेंद्या प्रवेश करतात.)

**सुबल**—भगवन् ! दुःखावेगानें या उभयतांचे काय उद्गार निघत आहेत ते ऐकिले ना ?

**नारद**—सुबल, हें नुसतें अज्ञानाचें प्रदर्शन आहे. आई क्षणभर लपून आपल्या बालकांच्या प्रेमाची कसोटी पाहते ह्मणून तिला आपल्या मुलांचा कंटाळा आला आहे असें कोण ह्मणेल ? स्वतःच्याच कलुषित मनोविकारांशीं ईश्वराच्या न्यायान्यायाची तुलना करूं पाहणारे हीच चुक करून स्वतःलाच फसवून घेत असतात. (पुढें होऊन) राजा ? काय तुझें वेड हें ?

**नंद**—कोण ? मुनिवर्य ? आतां माझ्या कृष्णाला मी कुठें हो पाहूं ? न्यायानें वागून लोकांना सुखी करतांना मींच महद्दुःखी व्हावें ना ?

**३ रा गोप**—छेः छेः महाराज ! हा सारा आमचाच दोष. आह्मींच मूढानीं कृष्णाला थोडीशीं शिक्षा व्हावी ह्मणून फिर्याद आणली, पण शेवटीं त्यालाच मुकलों ? काय हो त्याचे गुण !

( रणछोड रायजी )

**गुण किति गाऊं । त्या केव्हां नयनीं पाहूं ॥ धृ० ॥ केलीं बहुत जरी गाऱ्हाणीं । कटुवच एक न वदला वदनीं । लाजावि सकलां सुमधुरवचनीं ॥ हृदयीं आतां त्यातें ध्याऊं ध्याऊं ॥ १ ॥**

**पेंद्या**—आतां कशाला रडतां ? तुह्मां लोकांचा स्वभावच असा कीं, जोंपर्यंत एखादा मनुष्य तुमच्यासमोर आहे तोंपर्यंत तुह्मांला त्याचे दोषच

दिसत असतात; पण तोच कायमचा अंतरला ह्मणजे तुह्मीं त्याचें गुण आठवून पोवाडे गाऊं लागतां.

**नारद**—राजा, प्रजेला सुख देणें हें तुझें कर्तव्य बजावण्याचा प्रयत्न तू केलास पण त्यामुळें संकट आलें ह्मणून सन्मर्गाविषयीं असा उदासीन कां होतोस? ही संकटें ह्मणजे ईश्वरी कृपेचीं निशाणेंच आहेत; हीं पुढील सुखाची परमावधी पटविणारी सुचिन्हें आहेत; या विपत्तीं निर्बलाला जेरीला आणतात पण ज्ञात्याला निधड्या छातीचा बनवितात. निर्बल मनुष्य संकटांनीं गांगरून जातो, पण ज्ञानी संकटांनां आव्हानच करीत असतो. कारण, कोणत्याहि मार्गांत संकटें येऊं लागलीं तर तो मार्ग श्रेयस्कर होईलच होईल अशी त्याची खात्री असते.

**यशोदा**—पण संकटांना कांहीं तरी मर्यादा आहे ना? कृष्णासारखा पुत्र आणि त्याचा अशा रीतीनें वियोग! हाय हाय! भगवन्, हें सहन तरी कसें करूं?

**वराई**—तरी मी त्याला सांगत होतें कीं कुलवधूंना नाडल्यानें कधीं कुणांचें कल्याण झालें नांहीं ह्मणून. आतां शेवटीं हें असें झालें! बोला फुलाला गांठ पडते ती हीच? आतां लोक ह्मणतील ह्या ह्मातारीची बत्तिशी वठली.

**मधु**—कायग थेरडे, कांहीं काळवेळ समजतो कीं नाहीं तुला? कालाच्या थपडीसरशीं तुझी बत्तिशी पडून गालांना खळग्या पडल्या तरीही अजून तुझी जीभ वळवळावयाची थांबत नाहीं.

**पेंद्या**—खळग्या पडल्या ह्मणून काय झालें? बत्तिशी पडल्यामुळें हिच्या जिभेला वळवळावयाला तेवढीच अधिक जागा सांपडली? दुसरें काय?

**वराई**—अरे पोरांनो, अजून तुमची तोंडपाटिलकी थांबली नाहीं.

**पेंद्या**— अग थेरडे, वयाच्या ओझ्यानें तुझी मान वांकून कमान झाली, मृत्यु जवळ उभा असल्यामुळें जमिनींत तोंड खुपसून असतेस तरी अजून तुझा ताठा कमी होत नाहीं ना? थांब, ह्मातारपणामुळें तूं निस्तेज झाली आहेस ह्मणून तुझें तोंड चांगलें रंगवून काढतों.

**नारद**—अरे मुलांनों, उगीच तिला कशाला बोलता? प्रकृतिस्वभावापुढें निग्रह देखील फिका पडतो, मग ही तर शिथिल मनाची वृद्धाच?

बोलूं द्या तिला. देवी यशोदे, कृष्ण ईश्वरावतार आहे हें तूं जाणतेस ना ? जो या अखिल ब्रह्मांडाचें उत्पत्तिस्थान आहे त्याला हें क्षुद्र कीटक काय करूं शकणार आहेत ? स्वस्थ ऐस. डोहांत कालियाशीं युद्ध करूनहि कृष्ण सुखरूप आहे.

**यशोदा**—अहाहा ? भगवन्—

( देविका मनाऊ )

**सांगुनी सुवार्ता सदया शांत हृदय केलें आतां ॥ धृ० ॥**
**करपल्या तरूला । सिंचुनी जलाला । अंकुरासि जीवन**
**देतां ॥ १ ॥**

**नंद**—तो सुखरूप आहे तर आह्मीं सर्व असे तळमळत असूनहि तो कां बरें येत नाहीं ?

**नारद**—राजा, वडिलांचें संकट पाहून त्याला बळी होणारा तुझा पुत्र कृष्ण कालिया डोहांत गेला पण दुर्जनांचा शास्ता आणि भक्तांचा कैवारी श्रीकृष्ण भक्तांच्या हांकेला केव्हांही येईल !

**पेंद्या**—वा ! मग कर्तव्यावर लांबलचक व्याख्यान झोडावयाच्या ऐवजीं मघांशींच आह्मांला हें कां नाहीं सांगितलेंत !

**नारद**—मनाची पूर्ण तयारी झाल्याशिवाय अंतींचा उपाय एकाएकीं सांगितल्यास त्याचें महत्व मात्र कमी होत असतें. तरीहि पण तुमच्या समाधानाकरितां थोडेंसें सांगतों. भक्ति संपादणें हेंच तुमचें महत्तम कर्तव्य आणि भगवंताचें सान्निध्य नित्य होणें हें त्याचें फल. मग जो नित्य सन्निध आहे तो हाकेला काय दूर आहे ! आतां तुह्मीं प्रत्यक्ष याचा अनुभवच पहा, भक्ताच्या हाकेला भगवंत केव्हांहि येईलच येईल.

**पेंद्या**—भक्तांच्या हांकेला येईल ना ? मग आमच्या हांकेला तर अगदीं ठेवलेलाच ह्मणून समजा ! आह्मीं त्याचे बाळपणापासूनचे परम मित्र. आमच्या हांकेला यावयाचा नाहीं तर यावयाचा तरी कुणाच्या ? पहा मी आतां त्याला हांक मारतों.

**मधु**—नाहीं—नाहीं—मी पहिल्यांदा हांक मारणार. कारण ब्राम्हणाचा अग्रमान !

**पेंद्या**—नाहीं—नाहीं—मी आधीं ! मी तर कृष्णाचा ज्ञातिबांधव !

**सुबल**—मधुमंगल, पेंद्या, असे झगडतां कां ? क्रमाक्रमानेच होऊद्या. ही परिक्षेचीच वेळ आहे.

**मधु**—( स्वगत ) आपण आपलें मागेंच रहावें. कारण पेंद्याची फजिती झाली तर आपल्याला बिनबोभाट काढता पाय तरी घेतां येईल. ( उघड ) बरें बुवा, आमचें राहिलें. कोणाच्या तरी दिव्यानें एकदांचा प्रकाश पडो ह्मणजे झालें.

**पेंद्या**—हं आतां पहा महाराज—कृष्ण अगदीं आलाच म्हणून समजा ( जरा पुढें होऊन ) हं आतां नीट लक्ष्य द्या हं !—( हाक मारतो ) आला काय ? अशा कोरड्या हांका मारून कांहीं हा येणार नाहीं. याला आहे संगीताची आवड ! तेव्हां या संगीत कुंजविहारीला संगीतच हांक मारली पाहिजे—

( तोरि छलबल है )

**येइं धावोनि आज । राखिं माझीही लाज ॥ मज हांसेल**
**जन् जरि ना येसी ॥१॥**

( पाहून ) काय आला ? नाहीं अजून ? त्याला कुठें आहे माझ्या लाजेची पर्वा ? आतां दुसरेंच कांहीं तरी कारण लावावें—

( चाल सदर )

**तुझि रानांत गाय । नच चाराहि खाय ॥ नच येसी**
**तरी राहि उपवासी ॥ २ ॥**

हं ! तो पहा आला ! त्या गाईवर त्याचें तसेंच प्रेम आहे मुळीं ! यंव्, कसें कारण काढलें शोधून ?

**मधु**—ह्यांत, ती नुसती झाडाची सांवली ! असा कांहीं कृष्ण यावयाला बसला आहे ?

**पेंद्या**—बरें आतां पहा—त्याला जरा राग येईल असें करतों—

( चाल सदर )

**होइ माझी आबाळ । मला खाईल काळ ॥ तुज देईन**
**गाळ जरि ना येसी ॥ ३ ॥**

**मधु**—कायहो ज्ञातिबांधव, कसें काय ? ब्राम्हणावर ताण करावयाला पहात होतां ना तुह्मी ? आतां उडाली कीं नाहीं फजिती ! ( हंसतो. )

**पेंद्या**–(स्वगत) बाजू आंगावर आली ! पण आतां कशी तरी वेळ मारून नेली पाहिजे. (उघड) एवढें शेफारून जावयाला नको कांहीं. आमची फाजिती ती तुमची पण फजितीच ! कारण, तुह्मी आह्मी दोघेहि कृष्णाचे मित्र. आणखी फजितीच जर झाली नाहीं तर एवढें हें: हें: करून हंसावयला काय झालें आहे ? असें पहा, महाराज ! हा कृष्ण असाच केव्हांतरी लपून बसतो आणि आह्मीं कितीहि घसा फोडला तरी येत नाहीं. पण तीच आईसाहेबांची हांक कानीं पडतांच कसा पळत येत असतो ! काय आईसाहेब आठवतेंना तुह्मांला ?

**मधु**–( स्वगत ) आपल्यावरची पाळी टाळावयाला हीच बरी संधि आहे. (उघड) खरेंच आईसाहेब, आपण एकदां हांक मारून तर पहा.

**यशोदा**–बरें बाबांनों, पहातें प्रयत्न करून–

( मोठानु वचन )

दावोनि वदन निज श्याम शांतवीं या हृदया । निजमा-
तृमना सुखधाम झणीं ये शांतीमया ॥ धृ० ॥ वत्स चुके
तैं रानीं हंबरें जैशी दीना गाय रे । ही तव माता बाहे
तैशी उचलुनि, कोमल पाय । झणिं ये धांवुनियां ॥ १ ॥

( सर्व उत्सुकतेनें डोहाकडे पाहतात )

**पेंद्या**–एकूण आमची एकट्याचीच कांहीं फजिती झाली नाहीं ह्मणावयाची, आईसाहेबांची पण जोड मिळाली ही समाधानाला मोठीच जागा आहे. कारण, कोणत्याहि कार्यांत फजितीला वांटेकरी मिळाल्याचें समाधान कार्यभागाच्या समाधाना खालोखाल असतें.

**नंद**–भगवन्, कृष्ण अझून कां बरें येत नाहीं ?

**नारद**–तें मी तरी काय सांगूं ? सर्व मिळून एक एकदां प्रयत्न तर करून पहा.

**मधु**–खरेंच महाराज इतरांचे उपाय हरलेच आहेत आतां आपण एकदां पहा हांक मारून (स्वगत) नाहींतर शेवटीं हें ब्रह्मास्त्र आहेच ह्मणा.

**नंद**– मधुमंगल, आईच्या निस्सीम प्रेमानें जें कार्य होत नाहीं तें बापाच्या सहेतुक प्रेमानें कसें होणार !

**यशोदा**–कृष्णा, आह्मांला वियोग दुःखांत लोटलेंस तें लोटलेंस पण वर हा फजितीचा प्रसंग तरी येऊं द्यावयाचा नव्हतास.

**नारद**—थांबा-असें वाईट वाटून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. तुमच्या हांकेला कृष्ण कसा येईल ? तुमचें कृष्णावरचें प्रेम उत्कटतम आहे खरें, पण तें आपला पुत्र या नात्यानें आहे; भक्तांचा भगवंत या नात्यानें नव्हे. तुमचें प्रेम निस्सीम आहे खरें पण तें विकाररहित नव्हे. देहाशीं योजलेलें आहे, आत्म्याला ओळखून नव्हे; देह तर उघड उघड नाशिवंत ह्मणून त्याच्याशीं योजलेलें प्रेमही नाशिवंतच. तुह्मीं कोणावर प्रेम योजतां हें तुमचें तुम्हांलाच समजत नाहीं आणि ह्मणूनच प्रेमाचा विषय जो देह तो नाहींसा होतांच तुह्मीं हताश होतां हेंच प्रेम जर अविनाशी आत्म्याला ओळखून योजिलें गेलें असतें तर आज तुह्मीं असे हताश कां झालां असतां ?

**पेंद्या**—कृष्णाला हांक मारावयाला सांगतांना हे गोसावीबुवा व्याख्यानें देऊन देऊन आम्हांला हांका मारीत बसविणार आहेत वाटतें !

**नंद**—खरोखर भगवन्, हाच उपदेश आम्हांला पूर्वींच जर कोणीं केला असता तर आज आह्मीं असें हताश झालों नसतो. पण आतां आमचा कृष्ण कसा येईल ?

**नारद**—पहा, तुमच्याच भाषणाच्या उत्तरार्धावरून मी काय सांगितलें हें तुह्मांला मुळींच कळलें नाहीं असें उघड उघड दिसत आहे. थोड्याशा उपदेशपर वाक्यांच्या श्रवणानें भक्तीचें रहस्य जर सर्वांना कळलें असतें तर या मृत्युलोकांचेंच वैकुंठ बनलें असते. तुह्मीं डोळे मिटून सूर्य नाहींसा झाला ह्मणून रडणारे—मूर्तिमंत अज्ञानाचे पुतळे. तुमच्यापुढें हा कंठशोष व्यर्थ आहे. या वेळीं तुमच्या डोळ्यांत चांगलें झणझणीत अंजन घालावयाला कृष्णप्रेमानें हृदय उचंबळणारी एकहि व्यक्ति या गोकुळांत नाहीं काय ?

**रमण**—(राधेसह प्रवेश करतो) आहे, मुनिवर्य, भगवान् श्रीकृष्णाच्या प्रेमानें तुडुंब होऊन जिचें हृदय उचंबळत आहे अशी या सर्व गोकुळांत ही एकच व्यक्ति आहे.

**राधा**—भगवन्, ही एवढी थोर थोर मंडळी येथें ह्या वेळीं कां बरें जमली आहे ?

**नारद**—भगवती राधे,—

**सर्वजण**—(आश्चर्यानें) काय भगवती राधे !

**नारद**—या जगांत हिरे आणि गारगोट्या एकाच मोलानें विकल्या